






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २४९ – एप्रिल–जून १९८९

( म. रा. साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत )

**संपादक : शंकर सारडा**

संपादक मंडळ : डॉ. गं. ना. जोगळेकर,
डॉ. वीणा देव, डॉ. वसंत सावंत
प्रा. चंद्रकुमार नलगे

**या अंकाची किंमत : १० रुपये**
वार्षिक वर्गणी ( संस्थांसाठी : ४० रुपये )

मुखपृष्ठ : लक्ष्मीकांत तोष्णीवाल, पुणे

मुद्रक–प्रकाशक : श्री. राजा फडणीस कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०

मुद्रणस्थळ : साप्ताहिक मुद्रण, १०२५ सदाशिव, पुणे ४११ ०३०

अनुक्रमणिका

# अनुक्रम

१) संपादकीय ४
२) ग. वा. वेहेरे : मैफिलीतला माणूस / गं. ना. जोगळेकर ८
३) रा. शं. : एक प्राध्यापक सम्राट / कल्याणी दिवेकर १३
४) एक वाङ्मयप्रेमी भाषावैज्ञानिक / अशोक केळकर १६
५) सारस्वतांची पत्रसंपदा १९
अ) म. सा. परिषदेला आलेली पत्रे १९
ब) प्रा. श्री. के. क्षीरसागर यांना आलेली पत्रे ३३
क) प्रा. व. दि. कुलकर्णी यांना आलेले पत्र ४९
ड) अन्य काही पत्रे ५४
६) नाटक : १९८८ / सुरेशचंद्र पाध्ये ५९
७) भाषिक व्यवहारातील आलेख : लेखांक ६ / डॉ. द. न. गोखले ६८
८) रसास्वाद / डॉ. निशिकांत मिरजकर ७३
९) पुस्तक परिचय
मनमाधवी : मा. गो. काटकर / दिवाकर दुनाखे ७६
अंगणातले आभाळ : यशवंत पाठक / प्रभाकर दिघे ७९
अपराजिता : म. रा. कुंभार / प्रा. वसंत पाटील ८१
संत ज्ञानेश्वर : जीवन और कार्य / प्रा. मुरलीधर सायनेकर ८३

## महाराष्ट्र साहित्य परिषद

# साहित्यिक साहाय्य निधी

वृद्ध, अपंग आणि निराधार साहित्यिकांना आर्थिक साहाय्य देण्यासाठी महाराष्ट्र साहित्य परिषदेने १९८७ साली साहित्यिक साहाय्य निधी जमा करण्याची योजना हाती घेतली होती. या निधीला सढळपणे देणग्या देऊन साहित्यप्रेमी जनतेने साहित्यिकांबद्दलची आपली कृतज्ञता व्यक्त करावी, असे आवाहन वेळोवेळी करण्यात आले होते. या आवाहनाला साहित्यप्रेमी संस्था आणि व्यक्ती यांनी, तसेच साहित्य परिषदेच्या सभासदांनी उत्तम प्रतिसाद दिल्यामुळे ३० जून १९८८ पर्यंत एक लाख रुपयांचा साहित्यिक साहाय्य निधी जमा झालेला आहे. हा निधी जमविण्यास ज्या साहित्यप्रेमी रसिकांनी हातभार लावला त्यांचे आम्ही अतिशय आभारी आहोत.

जमलेल्या निधीच्या अंतरिम व्याजातून दि. २७ मे १९८८ रोजी झालेल्या साहित्य परिषदेच्या ८२ व्या वर्धापनदिन समारंभात, वयोवृद्ध साहित्यिक डॉ. वा. भा. पाठक यांना रु. ५०००/– आणि अहमदनगरचे तरुण कथालेखक श्री. अशोक थोरे यांना वैद्यकीय मदतीसाठी रु. १०००/– असे मानधन देण्यात येऊन, या निधीच्या प्रत्यक्ष कार्यवाहीस आरंभ करण्यात आला आहे, हे जाहीर करताना आनंद होतो.

दर वर्षी अधिकाधिक साहित्यिकांना जास्तीत जास्त मानधन देता यावे यासाठी किमान पाच लाख रुपयांचा साहित्यिक साहाय्य निधी जमविण्याचा साहित्य परिषदेचा संकल्प आहे. हा संकल्प शक्य तितक्या लवकर पूर्ण करण्यासाठी सर्व साहित्यप्रेमी रसिकांनी जास्तीत जास्त रकमेची देणगी रोख, चेकने किंवा ड्राफ्टने 'महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे' या नावाने पाठवावी अशी आग्रहाची विनंती आहे. या निधीसाठी दिलेल्या देणगीला आयकरातून सूट मिळणार असून देणगीची रीतसर पावती लगेच पाठविण्यात येईल. देणगीदारांची नावे महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या अंकातून प्रसिद्ध करण्यात येतील.

| | | |
|---|---|---|
| **म. श्री. दीक्षित**<br>कोषाध्यक्ष | **राजेंद्र बनहट्टी**<br>कार्याध्यक्ष | **ग. प्र. प्रधान**<br>अध्यक्ष |
| **गं. ना. जोगळेकर**<br>कार्यवाह | **राजा फडणीस**<br>कार्यवाह | **चि. शं. जोशी**<br>कार्यवाह |

---

अनुक्रमणिका

# संपादकीय

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा हा अंक म. सा. परिषदेच्या वर्धापनदिनी प्रसिद्ध होत आहे. मुख्यमंत्री शरदराव पवार यांच्या अध्यक्षतेखाली साजरा होणारा हा वर्धापन दिन अनेक दृष्टींनी संस्मरणीय ठरावा अशी अपेक्षा आहे. नामवंत कवी श्री. वा. रा. कान्त यांना यंदाच्या साहित्य परिषदेच्या पुरस्काराचा मान देण्यात आला आहे. श्री. म. श्री. दीक्षित यांच्या साहित्य संघटनेतील कामाचाही गौरव करण्यात येत आहे. नाटककार विनायक देवरुखकर यांना साहित्यिक साहाय्य निधीतून दरमहा विशिष्ट मदत देण्यास आरंभ होत आहे. डॉ. वसंत जोशी प्रभृतींनी संपादित केलेल्या भाषा आणि साहित्य या ग्रंथाचा तिसरा खंडही प्रसिद्ध होत आहे.

## वाङ्मयीन पत्रव्यवहार

या अंकात वाङ्मयीन पत्रव्यवहारावर भर देण्यात आला आहे. 'विश्रब्ध शारदा'द्वारे श्री. हरिभाऊ मोटे यांनी महाराष्ट्रातील नामवंत व्यक्तींच्या पत्रव्यवहाराची एक परडी वाचकांना उपलब्ध करून दिली. परंतु आपला पत्रव्यवहार जपून ठेवण्याची प्रवृत्ती आपल्याकडे क्वचितच आढळते. महात्मा गांधी, सरदार पटेल, जवाहरलाल नेहरू वगैरेंचा पत्रव्यवहार शासकीय पातळीवर प्रसिद्ध झाला आहे. परंतु साहित्यिक व कलावंत याबाबत बेफिकीर असल्याचे आढळून येते. पाश्चात्य देशात बहुतेक सर्व साहित्यिकांचे पत्रव्यवहार आणि अन्य कागदपत्रे काळजीपूर्वक जतन केली जातात आणि त्यांचा उपयोग अभ्यासकांना होऊ शकतो. हा पत्रव्यवहार पुस्तकरूपानेही प्रसिद्ध होतो आणि त्या त्या व्यक्तीच्या जीवनातील अनेक घटनांवर प्रकाश टाकतो. ऑस्कर वाइल्डच्या सुमारे हजार पत्रांचा संग्रह १९७४ मध्ये प्रसिद्ध झाला आणि त्याच्याकडे पाहण्याची अभ्यासकांची दृष्टीच बदलली त्याचे मूल्यमापन वेगळ्या प्रकारे होऊ लागले. ऑस्कर वाइल्डच्या मृत्यूनंतर ७० वर्षांनी हा पत्रव्यवहार प्रसिद्ध झाला. दरम्यानच्या काळात त्याच्या परिचितांनी त्याच्यावर भलेबुरे भरपूर लिहिलेले होते आणि ऑस्कर वाइल्डला आपण कशी मदत केली वगैरे फुशारकीने सांगितले होते. या पत्रांवरून त्यांपैकी अनेक परिचितांनी कसे खोटे वा विपर्यस्त लिहिले आहे हे उघड झाले आणि ऑस्कर वाइल्डबद्दल दीर्घकाळ रूढ असलेले प्रतिकूल वातावरण त्यामुळे निवळत गेले. पत्रे लिहिताना व्यक्ती ही अधिक मोकळी आणि प्रामाणिक असते; मुखवटा

धारण करीत नाही वा पोझ घेत नाही असेही नाही; परंतु एकूणच त्या व्यक्तीचे अंतरंग जाणून घेण्यासाठी पत्रांचा उपयोग होऊ शकतो. अमेरिकेचे माजी राष्ट्राध्यक्ष हॅरी ट्रुमन हे मनात आले की हवे ते पत्रात लिहून टाकत. परंतु नंतर त्यांनाच वाटे की हे पत्र पाठवले तर संबंधित व्यक्तीला दुखावल्यासारखे होईल. आणि ती पत्रे ते पोस्टात टाकत नसत. ट्रुमन यांनी त्या त्या वेळी लिहिलेल्या परंतु पोस्टात न टाकलेल्या पत्रांचा संग्रह पुढे प्रसिद्ध झाला आणि अनेक कसोटीच्या प्रसंगी ज्या व्यक्तींनी त्यांना अडचणीत आणले त्यांच्याबद्दलची त्यांची स्पष्ट मते या पत्रांमुळे अभ्यासकांना कळली. ट्रुमन यांच्या स्वभावाचे एक वेगळेच दर्शन त्यांतून घडले. राष्ट्राध्यक्षपदी बसल्यावर आपले रागलोभ आवरता येतातच असे नाही; ते पत्रांतून प्रकट केल्याविना चैन पडत नाही. परंतु आपल्या भावना रोखठोकपणे प्रकट करण्याने क्वचित् त्रासही होऊ शकेल हे लक्षात आल्यावर पत्रे फायलीत बांधून ठेवणे या प्रक्रियेलाही एक वेगळे महत्त्व ट्रुमनच्या संदर्भात आढळते.

मराठी साहित्यिक, कलावंत आणि विचारवंत यांनी आपला पत्रव्यवहार काळजीपूर्वक जतन करायला हवा आणि त्याचा वापर अभ्यासकांना पुढे व्हावा अशी व्यवस्था करायला हवी. ही जाणीव वाढीला लागावी म्हणून पत्रिकेच्या या अंकात काही पत्रे मुद्दाम दिली आहेत. ही पत्रे वेगवेगळ्या व्यक्तींकडून मिळालेली आहेत आणि निरनिराळ्या कालखंडातील आहेत.

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या पत्रव्यवहाराचे कागदपत्र जतन केलेले आहेत. त्यांची छाननी मध्यंतरीच्या काळात श्री. म. श्री. दीक्षित, राजेंद्र बनहट्टी प्रभृतींनी केली. महत्त्वाची पत्रे वेगळी केली. वर्गीकरण करून, संपादकीय टीपांसह ग्रंथरूपाने ती पत्रे प्रसिद्ध करण्याचा संकल्प आहे. रियासतकार सरदेसाई, चिं. वि. जोशी, आचार्य काकासाहेब कालेलकर, कवी साधुदास, राजकवी भा. रा. तांबे प्रभृतींची परिषदेला आलेली काही पत्रे या अंकात दिली आहेत. त्या त्या व्यक्तीच्या स्वभाव-विशेषावर त्यामुळे निश्चित प्रकाश पडेल. माजी मुख्यमंत्री बाळासाहेब खेर यांनी शासनाने शुद्धलेखन प्रमाणित करावे या सूचनेला पाठवलेले पाच-सात ओळींचे उत्तर त्यांची त्यांच्या भूमिका निःसंदिग्धपणे प्रकट करून, शासन या चक्रव्यूहात स्वतःला गुंतवून घेण्यास तयार नाही हे स्पष्ट करते.

प्रा. श्री. के. क्षीरसागर यांना आलेल्या पत्रांची एक फाइल श्रीमती शकुंतला क्षीरसागर यांनी उपलब्ध करून दिली. त्यातील काही पत्रे या अंकात समाविष्ट केली आहेत. प्रा. क्षीरसागर यांनी सुफी पर्णे या आपल्या लेखनाच्या संदर्भात डॉ. व. दि. कुलकर्णी यांना पाठवलेले विस्तृत पत्रही या अंकासाठी मुद्दाम मिळवले. रंगा मराठे, माधव कोंडविलकर, अविनाश कांबळे प्रभृतींनीही काही पत्रे पाठवली. अशी पत्रे पुढेही प्रसिद्ध करण्याची इच्छा आहे. मात्र त्यांचे स्वरूप वाङ्मयीन

असावे. मूळ पत्रे आमच्याकडे पाठवू नयेत. झेरॉक्स प्रती पाठवाव्या. विविध नामवंत व्यक्तींमधील त्या त्या वेळची भावनात्मक नाती जाणून घेण्यासाठी पत्रांसारखे साधन सापडणार नाही. या अंकात दिलेली पत्रे आपले कुतूहल जागृत करतील अशी आशा आहे. सर्व संबंधितांच्या सहकार्याबद्दल धन्यवाद.

## डॉ. यशवंत मनोहर

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या अध्यक्षपदी दलित कवी व समीक्षक डॉ. यशवंत मनोहर यांची नियुक्ती झाली. उपाध्यक्षपदी प्रा. रतनलाल सोनग्रा यांची योजना झाली. महाराष्ट्राच्या शासनाने आपली पुरोगामी भूमिका या निमित्ताने कृतिशील असल्याचे दाखवून दिले. डॉ. यशवंत मनोहर हेही उत्साहाने या मंडळाला नवी प्रतिमा देण्यासाठी नवनव्या योजनांचे संकल्प सोडत आहेत. मंडळातर्फे एक वाङ्मयीन द्वैमासिक काढून महाराष्ट्रातील समकालीन प्रतिभेला व्यासपीठ मिळवून देण्याचा त्यांचा बेत आहे. सगळा महाराष्ट्र त्यांना एका ग्रुपमध्ये बांधायचा आहे. विज्ञाननिष्ठा आणि त्यावर अधिष्ठित असणारा मानवतावाद यांचा पुरस्कार हे द्वैमासिक करील. साहित्य संस्कृती मंडळाची पुस्तकेही अधिक कमिशनने विकण्याबाबत ते उत्सुक आहेत. ती गोदामातून बाहेर आणायची आहेत. ग्रंथालयांनी ही पुस्तके अग्रक्रमाने खरेदी करावी असा फतवा काढण्यासही त्यांची ना नाही. वार्षिक ३२ लाखांची उलाढाल हे मंडळ करते. वाङ्मयकोश, शब्दकोश, वाङ्मयप्रकल्प, नवलेखकांना अनुदाने, प्रकाशनासाठी अनुदाने, शिबिरे, मान्यवरांना पारितोषिके या खर्चाच्या मुख्य बाबी. जीवन सुंदर व्हावं म्हणून जे साहित्यिक लिहितात; त्यांच्यासाठी सौंदर्यशास्त्र उपयुक्त; परंतु जीवनातल्या कुरूपतेला दृढ करणाऱ्या परिवर्तनवादी साहित्यिकांच्या साहित्यशास्त्राला कौरुप्यशास्त्र असे म्हणावे असाही डॉ. मनोहरं यांचा प्रस्ताव आहे. स्वतःला ते आंबेडकरवादी म्हणवून घेतात. दलित वाङ्मयाला त्यांनी झुकते माप दिले तर त्यात काही अनुचित नाही; परंतु साहित्य हे अखेर एकात्म असते; दलित वा ग्रामीण वगैरे भेद अभ्यासाच्या सोयीसाठी पडतात; आणि जनमानसाच्या व जनजीवनाच्या सम्यक् व समग्र चित्रणाच्या ताकदीवरच त्याचे मोल ठरते याचा विसर पडू नये. वाङ्मयीन क्षेत्रात राजकीय सोयीने मूल्यविवेक होणे कधीही इष्ट नाही. साहित्य संस्कृती मंडळाचा कारभार आजवर अनेकदा वादग्रस्त व टीकाविषय ठरलेला आहे. नव्या पदाधिकाऱ्यांनी तो चातुर्याने करून सर्वांची वाहवा मिळवावी अशी कामना.

## मंगेश पाडगावकर

मराठी नवकवितेचे एक अग्रपूजेचे मानकरी मंगेश पाडगावकर यांनी दिनांक १० मार्च ८९ रोजी आपल्या वयाची साठ वर्षे पूर्ण केली. बालकवी, बोरकर, ना.

घ. देशपांडे व कुसुमाग्रज यांच्याशी जवळीक साधणारी व तरीही स्वतःचे स्वतंत्रपण जपणारी पाडगावकरांची कविता लोकमान्यता आणि राज्यमान्यताही मिळवणारी ठरली. अनेक श्रुतिमधुर गाणी त्यांनी दिली. सामाजिक जीवनातील अवमूल्यनाला उपहास–उपरोधाची फोडणी देऊन वात्रटिकांचाही गदारोळ त्यांनी उडवून दिला. ' या माझ्या पंखांनी उडण्याचे वेड दिले; अन् माझ्या हातांनी घरटे हे निर्मियले ' अशा या जिप्सीने मराठी तरुणवर्गाला एकेकाळी भुरळ घातली होती. पाडगावकरांच्या काव्य प्रतिभेला नवा रम्यमधुर बहर येवो हीच सदिच्छा.

सोलापूरचे कवी माधव गोविंद काटकर यांनी जानेवारी १९८९ मध्ये ७६ व्या वर्षात पदार्पण केले. त्यानिमित्त त्यांचा सत्कारही झाला. त्यांचे अभिनंदन.

पु. ल. देशपांडे यांना अ. भा. नाट्य परिषदेचा दहा हजार रुपयांचा राम गणेश गडकरी पुरस्कार कुसुमाग्रजांच्या हस्ते देण्यात आला.

आशा बगे यांना अ. वा. वर्टी कथालेखन पुरस्कार आणि लीला पाटील यांना ' शिक्षणातील ओअॅसिस ' बद्दल अकोलकर पुरस्कार नाशिक येथे देण्यात आले.

पु. ल. देशपांडे यांच्या निवडक साहित्याचे कानडी भाषांतर 'पु. ल. व्यक्तिमत्व वाङ्मय ' याचे गिरीश कर्नाड यांच्या हस्ते प्रकाशन झाले, कानडी–मराठीचे घनिष्ठ नाते प्रकट करणारा हा एक संस्मरणीय समारंभ होता.

पाणिनीय व्याकरण आणि भाषा तत्त्वज्ञान (वामनशास्त्री भागवत) मराठी भाषा आणि शैली (रमेश आणि अश्विनी धोंगडे) यांना मराठी अभ्यास परिषदेच्या वतीने पुरस्कार देण्यात आले.

या सर्वांचे अभिनंदन.

कविवर्य कुसुमाग्रज यांना ज्ञानपीठ पुरस्कार प्रदान करण्याचा सोहळा मुंबईत संपन्न झाला. दृष्ट लागण्यासारखा तो सुंदर झाला. कुसुमाग्रजांनी त्याप्रसंगी व्यक्त केलेले विचारही त्यांच्या चिंतनाची गगनभरारी दाखवणारे होते. दिल्ली आणि मुंबई येथेही त्यांचे सत्कार करण्यात आले. हे सर्वच कार्यक्रम मराठी अस्मितेला सुखावणारे ठरले.

**शंकर सारडा**
संपादक

# ग. वा. बेहेरे : मैफिलीतला माणूस

गं. ना. जोगळेकर

ग. वा. बेहेरे गेल्याला दोन महिने होऊन गेले. त्यांच्या निधनानंतर काही ठिकाणी शोकसभा घेण्यात आल्या. काही थोड्या नियतकालिकांनी मृत्युलेख लिहून त्यांना श्रद्धांजली वाहिली. पण अनेक नियतकालिकांनी बातमी देण्यावरच भागविले. त्यांच्याबद्दल चार बरे शब्द लिहिण्याचे मात्र टाळले. ज्याला सोइस्करपणे काल-परवाच 'प्रतिगामी' आणि 'जातीयवादी' ठरविले त्याच्याबद्दल चांगले लिहिणे सोपे नव्हते. लढाई अर्धीच टाकून बेहेऱ्यांना जावे लागले हे वाईटच झाले गेल्या वीस-पंचवीस वर्षात लढत आले त्याप्रमाणे हक्कभंगाची लढाई लढूनच त्यांनी जायला पाहिजे होते. बेहेरे आयुष्यभर हवे तसे जगले पण मरणाची वेळ मात्र त्यांनी चुकीची निवडली. पण गेल्या चार-पाच वर्षांतली त्यांची शारीरिक स्थिती लक्षात घेतली तर असे घडणे अटळच होते. पण त्यांच्या आकस्मिक जाण्याने बहुतेकांनी त्यांच्या 'हिंदुत्वनिष्ठे' वर भर देऊन तेच बेहेऱ्यांचे जीवन-सर्वस्व होते असे भासविले. आता असे करणे हेही संबंधितांना सोयीचे होते ही गोष्ट वेगळी. बेहेऱ्यांचे वागणं आणि त्यांची मते पटणारी नव्हती. या रागापोटी त्यांच्या मरणाची दखल न घेणे हेही चूक आणि त्यांना एकदम 'धर्मवीर' ठरवून त्यांची भलती प्रतिमा निर्माण करणेही चूक.

पण बेहेऱ्याना ज्यांनी जवळून पाहिले होते, त्यांच्या सहवासात काही दिवस घालविले होते, त्यांच्या रागालोभाचा अनुभव घेतला होता, परखडपणे त्यांच्याशी वादविवाद केला होता ते बेहेऱ्यांबद्दल टोकाची प्रतिक्रिया व्यक्त करणार नाहीत. कालपरवापर्यंत आपल्यात वावरणारा, खाण्यापिण्यात रमणारा, गप्पागोष्टीत रंगणारा आणि सर्वप्रकारच्या माणसांच्या सोबतीचा चाहता असा एक ज्येष्ठ मित्र आणि सामान्यातलाच थोडा वेगळा उठून दिसणारा माणूस एकाएकी मैफल मागे ठेवून निघून गेला या जाणिवेनेच त्यांच्या मित्रपरिवाराला आपण बरेच काही गमावल्याचे दुःख होते आहे. (श्री. ज.) जोशीबुवांच्या जाण्याने डाव मोडलाच होता; बेहेऱ्यांच्या जाण्याने एक डावच संपून गेला आहे.

बेहेऱ्यांना पुरुषी देखणेपणा निसर्गतःच मिळालेला होता. गोरा रंग आणि ताठकट उंचपणा यांमुळे त्यांच्याबद्दल कुतूहल निर्माण होत असे आणि त्यांच्या

गोष्टीवेल्हाळ स्वभावामुळे आपोआपच ते मैफिलीचे केंद्र बनत असत. तसे पाहिले तर बेहेरे अगदी चारचौघांसारखे होते. विशिष्ट परिस्थितीत त्यांचे महाविद्यालयीन शिक्षण अपूर्णच राहिले होते. एखाद्या विषयावर स्वतंपणे आणि फार मूलभूत असा विचार मांडण्याची कुवत त्यांच्या ठिकाणी नव्हती. त्यांचे वाचन बरेच विस्तृत होते हे खरे; पण पु. ग. सहस्रबुद्धे, श्री. म. माटे असे खंदे शिक्षक लाभलेले असूनही त्यांच्या विचारपद्धतीत नेमकेपणापेक्षा ऐसपैसपणाच फार होता. त्यांच्याशी दोन–चारदा वाद झडला की त्यांच्या अभ्यासाचे विषय मोजकेच आहेत याची जाणीव होत असे. पण आपल्या ठिकाणच्या अनेक त्रुटींवर बेहेरे मात करू शकत असत. निदान तसे भासवीत असत. त्यांची स्मरणशक्ती चांगली तल्लख होती. ग्रांथिक स्वरूपाचे संदर्भ प्रतिस्पर्ध्यासमोर फेकून त्याला निरुत्तर करणारी असल्या प्रकारची ही स्मरणशक्ती नव्हती; तर पंचवीस–तीस वर्षांपूर्वी अनुभवलेली एखादी घटना, भेटलेली एखादी व्यक्ती, गुदरलेला एखादा प्रसंग हे सारे जसेच्या तसे डोळ्यासमोर उभे करणारी, भूतकाळांत रमणारी अशी ही स्मरणशक्ती होती. आपल्या लहानपणाच्या वातावरणात, त्यावेळच्या परिस्थितीत या स्मरणशक्तीच्या मार्गाने बेहेरे शिरत असत. किस्सा रंगवून सांगण्याची कला त्यांना चांगलीच अवगत असल्यामुळे त्यांच्या या प्रकारच्या गप्पा श्रवणीय (आणि प्रेक्षणीयही) बनत असत. काय केले म्हणजे या गप्पा चविष्ट बनतात याचे त्यांनी गणित मांडलेले असे. थट्टा-मस्करीला शोभेल इतकी दुसऱ्याची टिंगल–टवाळी ते करीत असत, पण स्वतःला टिंगलीचा विषय बनविणे त्यांना अधिक आवडे. आपण कसले लेखक, आपण धड पदवीधरही नाही अशी स्वतःकडे कमीपणा घेण्याची त्यांची शैली होती. या त्यांच्या विशिष्ट पवित्र्यामुळे समोरच्या व्यक्तीला ते आपल्यातलेच वाटत. वृत्तीने एरवी भांडखोर असूनही बेहेऱ्यांनी गावोगावची शेकडो माणसे जोडली, हे यश साधे नव्हे !

कर्तबगार माणसांची गुणवत्ता शाळकरी वयापासूनच दिसायला लागते हा नियम बेहेऱ्यांच्या बाबतीतही दिसून येतो. बेचाळीसच्या चळवळीत त्यांच्या पायाला गोळी लागली हा तसा योगायोग; पण यामुळे सुरक्षित आणि चाकोरीतले जीवन जगावे असे त्यांना कधी वाटले नाही. सदुसष्ट वर्षांच्या आयुष्यातली निदान सत्तेचाळीस वर्षे बेहेरे काही ना काही करीत राहिले. त्यांनी अनेक उद्योग केले. (धंदेही केले; पण राजरोसपणे; उगीच संभावितपणाचा आव आणून नाही) काही वेळा नोकऱ्या केल्या, त्या सोडल्याही. रंगायन, ग्राहकपेठ अशा काही नव्या चळवळीत त्यांचा पुढाकार होता, त्यातून नंतर ते बाजूलाही झाले. अनेक नियतकालिके एकाचवेळी त्यांनी चालविली आणि त्यातून वेळच्या वेळी न कंटाळता हुकमीपणाने चौफेर लेखन केले. साहित्य परिषदेशी बराच काळ ते फटकून असत. (साहित्य संस्था हे मराठीच्या प्राध्यापकांचे अड्डे आहेत आणि तेथे पुण्यतिथी आणि शोकसभा

याखेरीज काही चैतन्यदायी कार्यक्रम होत नाहीत ही त्यांची तक्रार होती ! ) पण एकदा परिषदेत भाग घ्यायचे ठरविल्यावर ते पाच–सहा वर्षे परिषदेसाठी मनापासून झटले. मनाने एखादे काम स्वीकारल्यानंतर त्यासाठी तुटून पडण्याचा त्यांचा स्वभाव होता.

मात्र बेहेऱ्यांनी आतबट्ट्याचा व्यवहार कधी केला असेल, असे वाटत नाही. त्याबाबतीत ते पक्के व्यावसायिक होते. सोबतचा स्थिर लेखक कोणता, बदलती माणसे कोणती, कुणाला सांभाळायचे, कोण दुरावला तरी चालेल, कुणाला किती मानधन द्यायचे, कुणाला जास्त जवळ करायचे, कुणाला नाही याचा हिशेब ते नेहमी करीत असले पाहिजेत. त्यामुळेच ते यशस्वी संपादक होऊ शकले. सोबतकार म्हणून स्वतःचे एक खास स्थान निर्माण करू शकले. सोबतच्या प्रकाशनात त्यांनी कधी खंड पडू दिला नाही की अवाच्या सवा अपेक्षाही बाळगल्या नाहीत. सोबतची वाट पाहणारा आपला असा एक वाचकवर्ग मात्र त्यांनी तयार केला होता. ठराविक स्वरूपाची ' चटकदार ' सदरे नाही, कथा–कादंबरीसारख्या ललित वाङ्मयाचा ' धारावाही ' रतीब नाही, रंगीबेरंगी छपाई नाही असले नकारच जास्त असूनही सोबतची लोकप्रियता टिकून राहिली, हे कसे काय शक्य झाले ?

' सोबत 'चे यश हे लेखक आणि संपादक अशा बेहेऱ्यांचेच यश होते असे म्हटले पाहिजे. वृत्तपत्रांच्या पसाऱ्यात एक तरी निखळ मतपत्र पाहिजे ही गरज त्यांना जाणवली होती. तसे हे मतपत्र संपादकाचे आणि इतर लेखकांचे होतेच; पण ते वाचकांचेही होते. बेहेऱ्यांच्या किंवा अन्य लेखकांच्या लेखनाबद्दल बऱ्या–वाईट प्रतिक्रिया व्यक्त करणारी वाचकांची पत्रे ' सोबत 'मध्ये इतकी असत की अशा पत्रांमुळेही एखाद्या लेखाइतका मजकूर ( विनामूल्य ) मिळत असे. मतप्रदर्शनाच्या बाबतीत येथे मुक्तद्वार आहे असे चित्रही त्यातून उमटत असे. एखादा भडक मथळ्याचा आणि कडक भाषेतला लेख बेहेऱ्यांनी लिहिला की नंतर महिना-दोन महिने त्या लेखाबद्दल प्रतिक्रिया व्यक्त होत असत. अवतीभोवती जे चालले आहे त्याबद्दल असे सडेतोड लिहावेसे–बोलावेसे तर वाटते, पण ते आपल्याला शक्य नाही अशा सरळमार्गी माणसांना सोबतमधल्या धारदार लेखनाची नशा चढत असली पाहिजे. असे वाचक ' सोबतची किंमत वाढवा, आम्ही ती देऊ ' अशी संपादकाला गळ घालीत असत. वाचकांकडून ' किंमत वाढवा ' अशी मागणी होणारे अलिकडच्या काळातले सोबत हेच एकमेव साप्ताहिक असावे ! असा हुकमी वाचकवर्ग तयार केल्यामुळे सोबतचा खप तसा माफक असला तरी सोबत कधी तोट्यात गेला नाही. असलीच तर एखाद-दुसरी जाहिरात नाही तर सोळा पानी भरघोस मजकूर सातत्याने दिल्यामुळेही वाचकाला पुरेपूर मोबदला मिळतो असे समाधान लाभत असले पाहिजे.



अनुक्रमणिका

प्रवासवर्णन, रामायण महाभारतासारख्या ग्रंथांबद्दलची लेखमाला, नाटक-चित्रपट, विस्तृत पुस्तक परीक्षण, अनुभव कथन करणारी सदरे अशी सोवतच्या लिखाणाची बहुविधता असली तरी बेहेऱ्यांचे लेखन हा सोवतचा कणा होता आणि तो चांगलाच ताठ होता यात शंका नाही. गत आयुष्यातील आठवणी, व्यक्ती, प्रसंग, त्या निमित्ताने एखादी चिंतनशलाका, जीवनाचे रहस्य उलगडल्याचा आभास, निसर्गाचे रम्य चित्र, त्यातून पुन्हा मानवी जीवनावर भाष्य, एखादे आवडलेले किंवा न आवडलेले पुस्तक, त्याबद्दलची सविस्तर टीका किंवा सौंदर्यास्वाद अशा प्रकारचे चौफेर लेखन वेगवेगळी नावे धारण करून बेहेरे लिहीत असत. त्या त्या प्रकारचा मजकूर आवडीने वाचणारे वाचकही होतेच. हा लेखक एकाच वेळी एकदम कडक आणि अति हळुवार लेखन कसे काय करू शकतो याचे विशेष आश्चर्य वाटणारे वाचकही काही कमी नव्हते. इतर लेखकांचे निम्मेअधिक साहाय्य असले तरी निम्मा मजकूर एकटयाच्या बळावर ही किमया साधलेले मराठी पत्रकार आणि लेखक फार थोडे होऊन गेले. विष्णुशास्त्री चिपळूणकर, शि. म. परांजपे, अच्युत बळवंत कोल्हटकर, 'नवयुग'कार आचार्य अत्रे, 'विविध वृत्त'चे तटणीस ही परंपरा समर्थपणे चालविणारा आजचा लेखक पत्रकार म्हणून मराठी वाङ्मयात बेहेऱ्यांच्या कर्तृत्वाची नोंद करावीच लागते.

राजकीय-सामाजिक स्वरूपाच्या घडामोडींबद्दचे बेहेऱ्यांचे अग्रलेख ( पहिले पान ) विशेष प्रभाव पाडणारे असत. कॉंग्रेसजनांचा भ्रष्टाचार, कम्युनिस्टांचा नाकर्तेपणा, समाजवाद्यांची दिवाळखोरी, हिंदुत्ववाद्यांचे कर्मकांड, साहित्य व शिक्षणक्षेत्रातला भंपकपणा असे काही ठराविक विषयच या पहिल्या पानात असत. शीर्षक आणि प्रसंगाची पार्श्वभूमी तेवढी वेगळी असे. त्यामुळे नुसते शीर्षक वाचले तरी बेहेऱ्यांना काय म्हणायचे आहे ते लगेच लक्षात येत असे. ठाम विचार, निःशंक मते आणि ठाशीव रोकडी भाषा यामुळे हे पहिले पान हुकमी दाद मिळवीत असे. आपण एकटेच काय ते प्रवाहाविरुद्ध पोहणारे आहोत ही जिद्दही या लेखातून दिसेल असा परिणाम बेहेरे साधत असत. राजकीय व्यक्ती, प्रसंग, हिंदू-मुसलमान संबंध इत्यादी प्रश्नावर सातत्याने आणि सडेतोड लिहिण्याची बेहेऱ्यांना सवयच झाली होती, मजकूर तोंडी सांगण्याच्या पद्धतीमुळे त्यांचे लेखन सोपे आणि प्रवाही होत होते, हे सगळे खरे असले तरी कायद्याच्या कचाटयात बेहेरे अडकून पडले आहेत असे बहुधा कधी झाले नाही. एक तर बेहेरे याबाबत स्वतःच अनुभवातून शहाणे झाले होते आणि दुसरे म्हणजे या क्षेत्रातल्या तज्ञांचा सल्लाही ते घेत असत. सोबतवर अनेक खटले भरले गेले; पण सोबतला त्याची झळ पोचली नाही; कारण भावनांना आवाहन करणारे लेखन करूनही आंतरिक मर्यादा सोडायची नाही ही कसरत ते नेहमीच करत राहिले. आलंकारिकता, उपरोध, वक्रोक्ती आणि प्रांजळपणा यांचे एक अपूर्व मिश्रण बेहेऱ्यांच्या भाषेतून वाचकास जाणवत



अनुक्रमणिका

राहते. एखाद्या घटनेचे आणि व्यक्तीचे यथार्थ आकलन वेहेरे अग्रलेखातून प्रकट करीत असत. त्यामुळेच त्यांचे मृत्यूलेखही चांगलेच गाजले. आपल्या लेखनाचा इष्ट तोच परिणाम होतो या जाणिवेने वेहेरे सुखावत असत. अधिकाधिक मनःपूर्वकतेने वाचकांशी संवाद साधत असत. त्या भरात भरपूर आत्मनिंदाही करून घेत असत. या साऱ्यामुळे हा आपल्यातलाच एक मैफल रंगवणारा चतुर माणूस आहे या जाणिवेने वाचकाचीही भरघोस दाद मिळत असे.

अशी अनेक वर्षांची जमलेली मैफल सोडून हा सावध पण कलंदर माणूस एकाएकी निघून गेला या दुःखाची सोबतच आता उरली आहे.

□



अनुक्रमणिका

# रा. शं. : एक प्राध्यापक सम्राट

**कल्याणी दिवेकर**

काही व्यक्तींना आपण आयुष्यात इतकं गृहीत धरलेलं असतं की, त्यांची पाळंमुळं किती खोलवर रुजली आहेत, ते त्यांच्या गैरहजेरीतच नेमकेपणानं उमगतं. वाळिंबे सर गेल्यानंतर दुःखापाठोपाठ गेल्या पंचवीस वर्षांच्या परिचयातून जाणवलेली सरांची असंख्य रूपं डोळ्यापुढे येत राहिली. किरकोळ मतभेदातून लहान मुलांसारखे रागावणारे सर, मानापमानांच्या कल्पनांतून पूर्वग्रहांची, गैर-समजांची जाळी उभारणारे सर, चांगल्या गोष्टींबद्दल मनापासून दाद देणारे नि कुटुंबातल्या सर्वांची आस्थेवाईकपणानं चौकशी करणारे सर आणि स्वतःवर विलक्षण प्रेम असणारे सरही...

सरांशी असलेला परिचय, सातत्यानं इतकी वर्षं टिकून राहिला हे एक आश्चर्यच. कारण सरांची ख्यातीच अशी की एकदा एखादी व्यक्ती 'ब्लॅक लिस्ट' मध्ये गेली तर पुनः परतीची वाट बंद. सरांच्या हाताखाली काम करणाऱ्या, प्रत्येक विद्यार्थ्याच्या मनात ही दहशत असायची. सर आत केबिनमध्ये असताना कॅरिडॉरमध्ये वावरताना देखील भीती वाटायची. त्यांच्या आवाजाच्या सावली-तूनही जणू धाक जाणवायचा. प्रत्यक्ष वर्गातल्या व्याख्यानाच्या वेळचा रुबाब तर औरच!

सरांची वर्गातली 'एन्ट्री' नाट्यपूर्ण असायची. एखाद्या सम्राटाप्रमाणे सर वर्गात यायचे. त्यांच्या येण्याची चाहूल लागताच १००–१५० विद्यार्थ्यांचा वर्ग एकाएकी स्तब्ध व्हायचा. खुर्चीवर स्थानापन्न होण्यापूर्वी चष्म्याच्या काचेआडून एक भेदक नजर वर्गावरून फिरायची. कल्पनेनंच नजरेतल्या त्या विखाराचा स्पर्श जाणवून अंगावर काटा यायचा. तोच, खर्जातल्या सुरात–

'काळोखाच्या जगामध्ये या
मृत आशांच्या चितांवरुनिया
पिशाच्च माझे भटकत आहे,
शांति नसेचि तया'

अशा ओळी कानावर पडू लागल्या की त्या साध्या लाकडी खुर्चीचं सिंहासन व्हायचं. एखाद्या चाणाक्ष विद्यार्थ्याला समजायचं की, गेले चार तास सर तसूभरही केशव-

सुत सोडून पुढे गेलेले नाहीत. पण असं सांगायची सोय नव्हती. शिवाय डस्टर, पाठ्यपुस्तक पोर्शन असल्या क्षुद्र गोष्टींमधे अडकवून घेणं या सम्राटाला मानवण्या-जोगं नव्हतं. पण चित्रा खोपकरसारखी एखादी हुशार विद्यार्थिनी वर्गात असेल, तर तास खूप रंगायचा.

ललित लवङ्लता परिशीलन कोमल मलय समीरे

हा जयदेवाच्या गीत गोविंदातील अष्टपदीचा एक चरण सरांनी उच्चारला की अलगद दुसरा चरण पुरा व्हायचा. एकामागून एक कालिदास, जगन्नाथ, भास, भारवी दरबारात हजर व्हायचे.

'चल सखि कुञ्जं सतिमिरपुञ्जं शीलय नीलविचोलम्'च्या तालावर सारा वर्ग डोलायचा. 'गंगालहरी' स्तोत्रानंतर जगन्नाथाला झालेला गंगेचा स्पर्श आम्हालाही स्पष्ट जाणवायचा, नि लागोपाठ दोन तास केव्हा संपले, ते कळायचं देखील नाही.

तेन, कार्लाईल, मिल्टन, मरी, जॉन्सन हे तर देशपांडे–कुलकर्ण्यांइतके ओळखीचे वाटायचे. मधूनच सुसानबाई आणि सँटायना काका भेटायचे. हा सारा अनुभवच विलक्षण रोमांचकारी असायचा. एखाद्या खोल दरीत कड्याच्या पाय-थ्याशी उभं राहून कड्यावरून कोसळणाऱ्या धबधब्यातला एखादा तुषार अंगावर झेलताना जसं धन्य वाटेल, तसं वाटायचं. अशावेळी ज्ञानेश्वर १५ मार्कांचे की १० मार्कांसाठी असले प्रश्न मनात उगवतच नसत. ही मंडळी फार मोठी आहेत त्यांच्यापर्यंत पोचायची वाट खूप बिकट आहे, एवढंच जाणवायचं. आणि सरांच्या अध्यापन कौशल्याचं रहस्य नेमकं इथेच दडलेलं होतं. एखादा पाठ किंवा अध्याय शब्दार्थांसकट समजावून देण्यापेक्षा विद्यार्थ्यांच्या मनात असमाधान पेरण्याचं, ज्ञानलालसेचा स्फुल्लिंग चेतविण्याचं कार्य हा सच्चा ज्ञानोपासक, अध्यापक करत होता. म्हणूनच त्या काळात पदव्युत्तर अध्ययन पूर्ण केलेल्या कोणाही विद्यार्थ्याचा असा गैरसमज होत नसे की ही पदवी म्हणजे अध्यापन करण्यासाठीचा परवाना आहे अजून किती तरी पल्ला गाठायचा आहे. याचं स्वच्छ भान देण्याचं अजोड कार्य सर करत होते. आजच्या 'चमचा भरवू' शिक्षणाच्या तुलनेत तर हे विशेषत्वानं जाणवतं. आज प्राध्यापकांना विद्यार्थ्यांचा अनुनय करावा लागतो. (काही दिवसांनी विद्यार्थ्यांपासून आपलं वेगळेपण टिकवून धरण्यासाठी प्राध्या-पकांना गणवेशच घालावा लागेल बहुधा.)

वर्गात विद्यार्थ्याला इतके दूर ठेवणारे सर वर्गाबाहेर त्याची सदैव काळजी घ्यायचे. एखादं शिफारसपत्र देताना विशेषणांची अशी खैरात व्हायची की 'हे सारं आपल्याबद्दलच लिहिलंय ना?' असा संभ्रम त्याला पडावा. वाढत्या वयाच्या मुलाचं मोठेपण जाणवून एखादा पालक जसा त्याला बरोबरीनं वागवू लागतो, तसा त्या 'मोठ्या' होत जाणाऱ्या विद्यार्थ्यालाही हळूहळू मान मिळायचा.



अनुक्रमणिका

'काय, माझा अर्धवट राहिलेला गडकऱ्यांचा अभ्यास करताय पुरा ?' असा अवघड सवाल टाकल्यानंतर ते अवजड शिवधनुष्य पेलायची ताकद संबंधित विद्यार्थ्याजवळ नसेल, तर मात्र 'वाग्वैजयंती'ची पानं चिकटवण्याची उमेदवारी निमूटपणे करावी लागे. पण एकदा समान दर्जा मानल्यानंतर तिथे श्रेष्ठ–कनिष्ठ भाव उरत नसे. 'पसंतीची पावती' मिळण्याबरोबरच टीकेचं हलाहलही पचवण्याची तयारी ठेवावी लागे. ह्या कृपाप्रसादाचा लाभ अनेकांना झाला आहेच.

'स्वतः'वर विलक्षण प्रेम करणारा हा समीक्षक होता, कित्येकदा त्यांच्या जवळपास वावरणाऱ्यांना त्यातून अहंकाराचा दर्प जाणवायचा. पण हा अहंकार एखाद्या कलावंतासारखा होता. 'स्वतः'वर खूप होणं, आणि प्रेम करणं यामधला जातीचा फरक लक्षात घेतला तर त्याची मीमांसा करणे शक्य आहे. ज्ञानोपासने-साठीच जगणाऱ्या या कलावंताने अखंड ज्ञानयज्ञ उभारला होता. प्रकृतीची साथ नसतानाही वाऊ न करता अखंड वाचन–मनन, व्याख्यान–लेखन यात रमून जाणं हेच त्यांचं जीवन होतं आणि अगदी अखेरच्या यात्रेला निघतानाही हाच ध्यास सोबतीला होता.

गोव्याला जायच्या आधी चारच दिवसांपूर्वी सर भेटले होते. गोव्याच्या लोकांनी कसं अगत्यपूर्वक निमंत्रण केलंय, कशी बडदास्त ठेवलीय, त्याबद्दल खुषीत येऊन सांगत होते. 'साहित्य–सूची'तल्या लेखांचं पुस्तक केव्हा निघणार ?' असं विचारल्यावर प्रसन्नपणे म्हणाले होते,

'पुस्तक ? अहो कोण पुस्तक काढणार या महागाईच्या दिवसात ? तरीही नांदुरकरांनी सांगितलंय, खूप लिहा, मनसोक्त लिहा. लिहिताना यत्किंचित् काटकसर करू नका'. चेहऱ्यावरचं आत्मविश्वासाचं हसूच सांगत होतं की, गोव्याहून आल्यावर दोन पुस्तकं निघणार. एक साहित्य–सूचीतल्या लेखांचं आणि दुसरं गोव्यातल्या व्याख्यानांचं.

–पण विपरीत घडलं... आता हे ज्ञानोपासनेचं व्रत आम्ही विद्यार्थ्यांनी पुढे चालवलं पाहिजे. तीच खरी श्रद्धांजली, नव्हे गुरुदक्षिणा ठरेल.

---



---

# एक वाङ्मयप्रेमी भाषावैज्ञानिक

अशोक रा. केळकर

डॉ. नारायण गोविंद कालेलकर यांच्या निधनाने एका वाङ्मयप्रेमी भाषा-वैज्ञानिकाला आपण मुकलो आहोत.

त्यांचा जन्म ११-१२-१९०९ रोजी वांवुळी गावी ( रत्नागिरी जिल्हा, आता सिंधुदुर्ग जिल्हा ) झाला. त्यांचे वडील गोविंदराव वडोद्याला होते. ( त्यांनी एंथोव्हनच्या इंग्रजी पुस्तकाच्या आधारे मुंबई इलाख्यातील जातीजमातींवर मराठीत पुस्तक लिहिले. ते वडोदे सरकारने प्रकाशित केले. ) बडोदे आणि मुंबई येथे डॉ. कालेलकरांचे शिक्षण झाले आणि नंतर त्यांना पॅरिसला जायचा दोनदा योग आला. १९३९ साली फ्रेंच भाषा व साहित्य विषयाची पदविका ( दिप्लॉम ) आणि १९५० साली पॅरिस विद्यापीठाची डॉक्टर पदवी ( दॉक्तर एस लेत्र ) त्यांनी संपादन केली. फेर्दिनां द सोस्यूर, आंत्वान मेये, झूल ब्लॉक अशी त्यांची गुरुपरंपरा सांगता येईल. ब्लॉक यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी ऋद्धिपुरवर्णन या महानुभावी ग्रंथाचे भाषावैज्ञानिक अध्ययन आपल्या प्रबंधात केले.

वडोदे महाविद्यालय आणि विद्यापीठ या ठिकाणी त्यांनी १९४० ते १९५६ या काळात फ्रेंच भाषा व साहित्य आणि भाषाविज्ञान हे विषय शिकवले. फ्रेंच भाषेतून अनुवाद करण्याचा छंद त्यांना शेवटपर्यंत राहिला. कित्येक फ्रेंच कवितांचे मराठी अनुवाद आणि मेये यांच्या तौलनिक भाषाध्ययनपद्धतीवरच्या पुस्तकाचा मराठी अनुवाद त्यांनी केला. पण त्यांच्या भाषाविज्ञान विषयाच्या व्यासंगाला अधिक वाव मिळाला तो नंतर. डेकन कॉलेजमध्ये डॉ. सु. मं. कत्रे यांच्या पुढाकाराने भाषाविज्ञानाच्या आधुनिक वळणाच्या अभ्यासाला चालना मिळाली. रॉकफेलर प्रतिष्ठानाची ज्येष्ठ अभ्यासवृत्ती मिळून ते एक वर्ष अमेरिकेत गेले. विद्यापीठात राहून आले आणि नंतर त्यांची डेक्कन कॉलेजमध्ये नेमणूक झाली. इंडोएरियन भाषांचे रीडर ( १९५६-६२ ), इंडोयुरोपियन भाषांचे प्रोफेसर (१९६२-७३) आणि डेकन कॉलेजच्या भाषाविज्ञान विभागाचे प्रमुख (१९६९-७३ ) म्हणून त्यांनी काम पाहिले. एम्. ए. आणि पीएच्. डी. पदवीच्या विद्यार्थ्यां-खेरीज पश्चिम विभागीय भाषाकेंद्रालाही त्यांच्या मार्गदर्शनाचा लाभ झाला.

सुरवातीला बडोद्याच्या 'अभिरुची' मासिकातून त्यांनी मराठीत लेखन केले. मराठी माणसांमध्ये भाषाव्यवहार आणि त्यातून उपस्थित होणारे प्रश्न



अनुक्रमणिका






यांच्यावद्दल कुतूहल, आस्था आणि डोळसपणा प्रवर्तित करणे हे त्यांच्या बऱ्याच लेखनाचे प्रमुख उद्दिष्ट राहिले. विशेष म्हणजे केवळ विचारप्रवर्तनाच्या पुढे जाऊन मराठी माणसाचे भाषिक प्रश्न प्रत्यक्षात सोडवण्याच्या कामी हातभार लावण्याची सुसंधी प्राप्त झाली. महाराष्ट्र राज्याचे साहित्यसंस्कृतिमंडळ आणि भाषासल्लागार मंडळ यांचे ते सुरुवातीपासून वरीच वर्षे सदस्य होते. साहित्यसंस्कृतिमंडळाला त्यांनी आधुनिक मराठीचा एक विस्तृत शब्दकोश तयार करण्यासंबंधीची एक योजना सादर केली आणि सुरवातीची काही वर्षे संपादनाचे कामही पाहिले. त्याचप्रमाणे मराठी विश्वकोशातील भाषाविषयक नोंदीची जबाबदारीही त्यांनी सुरवातीची काही वर्षे संभाळली.

अलीकडची काही वर्षे मात्र प्रकृति–अस्वास्थ्यामुळे त्यांनी बऱ्याच कामांतून अंग काढून घेतले होते. पुणे येथे ३–३–१९८९ रोजी त्यांचे निधन झाले. ते अविवाहित होते.

त्यांची ग्रंथसंपदा सांगायची तर–

१) ध्वनिविचार, पुणे : डेकन कॉलेज, १९५५ (दुसरी आवृत्ती मौज प्रकाशन काढीत असल्याचे समजते.)

२) भाषा आणि संस्कृती, मुंबई : मौज, १९६२.

३) भाषा : इतिहास आणि भूगोल, मुंबई : मौज, १९६४.

४) मराठी, नयी दिल्ली : भारतीय सांस्कृतिक संबंध परिषद : (इंग्रजीत परिचय करून देणारी पुस्तिका

५) कॅटलॉग ऑव्ह काव्य मॅन्युस्क्रिप्ट्स्, पुणे : डेकन कॉलेज.

यांपैकी पहिल्या दोन पुस्तकांना महाराष्ट्र शासनाचा राज्यपुरस्कार मिळाला होता, तर तिसऱ्या पुस्तकाला साहित्य अकादमीचे मराठीचे वार्षिक पारितोषिक मिळाले होते.

भाषाविज्ञान विषयाच्या अमेरिकन परंपरेचा जरी त्यांनी परिचय करून घेतला होता तरी फ्रेंच भाषी परंपरेचा प्रभाव साहजिकपणे त्यांच्यावर अधिक टिकून राहीला होता. (सोस्यूर हा फ्रेंचभाषी पण स्विट्सर्लंडचा निवासी) वाङ्मय आणि वाङ्मयात प्रतिबिंबित होणारा सांस्कृतिक इतिहास यावद्दलही त्यांना आस्था होती. त्यांचा भाषेवद्दलचा दृष्टिकोण स्पष्ट करायचा तर–

१) भाषा ही एक सामाजिक संस्था आहे. तिचा त्या त्या समाजाच्या संस्कृतीशी निकटचा संबंध पोचतो.

२) भाषेचे अंतरंग समजावून घ्यायचे तर केवळ तिच्या लिखित स्वरूपाकडे पाहून चालणार नाही, तिच्या बोली अंगाकडे विशेष लक्ष द्यायला पाहिजे.

३) भाषेला इतिहास असतो हे खरे. पण कोणत्याही एका कालखंडात तिचा व्यवहार स्वयंपूर्ण असतो. तिच्या अध्ययनाला काळसापेक्ष बाजू असली तरी



अनुक्रमणिका

त्याचबरोबर तिचे स्थलसापेक्ष आणि समाजस्तरसापेक्ष वैविध्य आणि तिची एककालिक रचना यांनीही तपासणी स्वतंत्रपणे करायला हवी.

४) मराठी भाषेचा निकोप विकास व्हायचा तर तो तिच्या स्वतंत्र प्रकृतीला अनुसरून व्हायला हवा. तिला जसे इंग्रजीचे जोखड नको तसा संस्कृतचा सासुरवासही नको. विशेषतः परिभाषानिर्मिती करताना हे पथ्य पाळायला हवे.

५) शास्त्रीय लिखाण करताना भाषा काटेकोर पण सोपी असावी. अलंकारणाचा सोस नसावा. नवीन शब्द तयार करून वापरताना सुरवातीला त्यांचा अर्थ मराठीत स्पष्ट करण्याची जबाबदारी पाळावी. केवळ कंसात इंग्रजी शब्द देऊन मोकळे होणे रास्त नव्हे.

६) स्वभाषा म्हणून मराठी शिकवताना मराठी समाज व संस्कृति बहुजिनसी आहे, प्रमाण–मराठी ही सर्वांची आहे, ती कुणा एका विशिष्ट वर्गाची नाही याचे भान बाळगायला पाहिजे. प्रमाण–मराठी आपण सोय म्हणून स्वीकारली आहे याचा अर्थ प्रमाणेतर मराठी कनिष्ठ समजायची असा होत नाही.

७) मराठी वाङ्मयाचा अभ्यास करताना, विशेषतः मराठी कवितेचा अभ्यास करताना मराठी भाषेबद्दलही जाण असणे महत्त्वाचे आहे. भाषेचा अभ्यास आणि वाङ्मयाचा अभ्यास परस्परपूरक आहेत.

८) भाषेबद्दचे प्रश्न सोडवताना अभिनिवेशापेक्षा व्यवहारदृष्टी आणि व्यापक सहानुभूती यांची अधिक गरज आहे. माणसाच्या जीवनात स्वभाषेचे स्थान महत्त्वाचे आहे.

कालेलकरांचा एक जवळचा असा मित्रपरिवार होता, पण एकंदरीत समाजात मिसळण्याचा त्यांचा स्वभाव नव्हता. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाला काही कंगोरे अवश्य होते, पण मानवी स्वभावातील विसंगती हेरण्याची आणि तिची मौज चाखण्याची एक फ्रेंच वळणाची विनोदबुद्धीही त्यांच्याजवळ होती.

मराठी भाषेच्या वाङ्मयीन संसारात आपल्याला लेखनाने त्यांनी एक दालन उघडले. आधुनिक मराठी शब्दकोशाचे काम त्यांच्या हातून अधिक आकारास यायला पाहिजे होते असे वाटल्यावाचून मात्र राहवत नाही.

---

**समीक्षा**

- **गडकऱ्यांची नाटके** – चिंतन आणि आकलन, पाजणकर स. पां. महाराष्ट्र साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई ३२, १–१९८८, मूल्य ३६ रु.
- **मराठी कवितेचे अध्यापन** – सौ जोशी शैलजा, नूतन प्रकाशन, २१८१ सदाशिव पुणे ३०, १–१९८९, मूल्य ४० रु

---



अनुक्रमणिका

# *सारस्वतांची पत्रसंपदा*

**महाराष्ट्र साहित्य परिषदेला आलेली पत्रे**

---

हिंदी साहित्य संमेलन
संयोजक
काका कालेलकर

लिपि समिति कार्यालय
मगनवाडी, वर्धा
२०–६–'३५

कृ. सा. न. वि. वि.

आयुष्याचा बराच मोठा भाग महाराष्ट्राबाहेर राहिल्याने आणि सर्व प्रकारच्या प्रवृत्ती महाराष्ट्राबाहेरच चालविल्याने माझी स्थिती मराठी भाषा आणि साहित्याच्या दृष्टीने तरी रिप् व्हॅन् विंकल सारखी झाली आहे. परवा 'नवा काळा'त साहित्य संमेलनाच्या ठरावांच्या अंमलबजावणीचा वृत्तांत वाचून फार समाधान वाटले. आपल्या संस्था आता वर्षभर जागृतपणे काम करू लागल्याचे ते सुचिन्ह आहे. मी आपले मनःपूर्वक अभिनंदन करतो.

मला आपलेकडून मराठी शुद्धलेखनासंबंधीचे नियम हवे आहेत. शुद्धलेखनाच्या बाबतीत मला वाटते सान्यांच्या वेळेपासून चर्चा चालू आहे. हे चर्चात्मक साहित्य जर कोठे एकत्र मिळत असेल तर ते मला हवे आहे.

गुजरातीमध्ये शुद्धलेखनाची चर्चा ४० वर्षे चालली होती. ती सर्व चर्चा जमेस धरून आम्ही बहुजनमान्य असे नियम तयार केले व त्याविषयी एखादे वर्ष चर्चा करून लोकमताचा ठाव घेऊन त्याप्रमाणे शुद्ध 'जोडणी'चा शब्दकोश तयार केला. विद्वान लोक चर्चा करू लागले म्हणजे त्यांना कोणत्याही गोष्टींमध्ये finality झालेली सहन होत नाही. वादानंद कार्यानंदापेक्षा एक रोचक वाटतो. तरीही सुदैवाने गुजरात विद्यापीठाच्या जोडणी व कोशास बहुतेक सार्वत्रिक मान्यता मिळाली आणि तरीही तोच चालू झाला आहे. मराठीसाठी देखील अधिकृत जोडणीचा ( मराठीमध्ये शुद्धलेखनासाठी 'जोडणी' हा शब्द घेण्यासारखा आहे, कारण शब्दाची अक्षरे कशी जोडावयाची हाच मुख्य प्रश्न असतो ) शब्दकोश तयार केल्यानेच शुद्धलेखनाचा प्रश्न तडीस लागणार आहे. सामान्य जनतेला नियम समजत नाहीत, ध्यानात राहात नाहीत आणि अपवाद स्वीकारल्यावाचून नियमांचे चालत नाही.

फक्त प्रत्यय लावताना होणारे जोडणीचे फेरफार कोशात दाखविता येणार

नाहीत. त्याविषयीचे एक परिशिष्टच देऊन संतोष मानवा लागेल.

शुद्धलेखन विषयक नियम आणि साहित्य आपण पाठवून दिल्यास मी आपला आभारी होईन. कळावे ही विनंती.

ता. क.

हिंदी प्रचारक या नात्याने आपल्याला विनन्ति करावयाची की चौथ्या ठरावासंबंधाने इंदूर व ग्वाल्हेर या दरबारांशी करावयाचा पत्रव्यवहार आणि ठरावांचे अधिकृत भाषांतर इंग्रजीत हिंदीत झाल्यास विशेष चांगले. पाचव्या ठरावाचे अधिकृत इंग्रजी भाषांतर पाठविण्याची आवश्यकताच का असावी ?

आपल्या देवनागरी लिपि समितीशी आमचा सहकार चालू आहेच.

आपला
**काका कालेलकर**

काकासाहेब कालेलकर
मानसिंग रोड
नयी दिल्ली
भारत
३–८–५३

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वतीने मराठी साहित्य संमेलन यंदा अहमदाबादेस भरणार आहे हे वाचून आनंद झाला. भाषा भगिनींच्या क्षेत्रात मराठी साहित्य संमेलन होणे हे राष्ट्रीयदृष्टचा अभिनंदनार्ह आहे.

या संमेलनाच्या अध्यक्षपदासाठी आपण माझे नाव सुचविणार आहात व नियमाप्रमाणे याबाबतीत माझी संमति मिळविणे आवश्यक आहे. ही गोष्ट काहीशी नाजूक आहे.

मला स्वतःला वाटते की ज्यांनी मराठीची सतत अखंड सेवा केली आहे अशा व्यक्तीपैकीच कोणाला तरी अध्यक्ष करावे. मी तशी सेवा केली नाही याची मला जाणीव आहे म्हणून परिषदेच्या सदस्यांनी दुसऱ्या कोणा तरी योग्य व्यक्तीची पसंदगी करावी असा माझा स्पष्ट अभिप्राय आहे. हा अभिप्राय आपण मतदानाचा अधिकार असलेल्या सर्व व्यक्तींना कळवावा. वाटल्यास वर्तमानपत्रातही हे पत्र छापावे. इतक्या वरही जर सभासदांनी आणि स्वागतमंडळाने हे काम माझेवरच सोपविले तर मराठीचा एक नम्र पाईक म्हणून स्वीकारणे मी आपले कर्तव्य समजतो. कळावे,

आपला
**काका कालेलकर**

श्री

ता. १६-८-१९३५ मु. कामशेत, जि. पुणे

सा. न. वि. वि. महाराष्ट्र सा. परिषदेने परीक्षा घेण्याच्या बाबतीत जे प्रश्न आपण मला विचारले आहेत, त्यासंबंधाने मला वाटते मी पूर्वी एक वार आपला अभिप्राय कळविला होता, महाराष्ट्र युनिव्हर्सिटी काढण्याचा जो उपक्रम झाला होता, त्याचाच अंगभूत हा प्रश्न आहे. परिषदेने जरी हे भारी काम अंगावर घेतले तरी त्यास आजच्या स्थितीत महाराष्ट्र जनतेकडून विशेष मान्यता- मिळेल असे वाटत नाही. सबब हा प्रश्न परिषदेने तूर्त तहकूब ठेवावा आणि पुढे मागे परिषदेची सांपत्तिक व लौकिक योग्यता वाढली म्हणजे मग तो हाती घ्यावा असे माझे प्रामाणिक मत आहे. परीक्षांचा उपयोग ज्या शाळांकडून व्हावयाचा त्या शाळा परिषदेच्या ताब्यात नाहीत. नुसत्या मराठीच्या उच्च ज्ञानाने सरकारी नोकरीचे किंवा इतर खासगी नोकरीचेही काम भागण्यासारखे नाही. दोन परीक्षा ठेवणे किंवा तीन ठेवणे हा प्रश्न अगदी गौण आहे. सबब त्याचा निकाल आताच करण्याची मला आवश्यकता वाटत नाही. तथापि या बाबतीत माझे मत बिनचूक असे मी मानीत नाही. माझ्यापेक्षा अधिक व्यापक विद्वान मंडळी आहेत. त्यांनी याचा विचार करावा. यापेक्षा मला जास्त काही सांगावयाचे नाही. लोभ असावा ही विनंती.

**गो. स. सरदेसाई**

श्री

ता. २४।१२।१९३६ पो. कामशेत,
जि. पुणे

कृ. सा. न. वि. वि. व्याकरण परिषदेस हजर राहण्याबद्दल आपले बोलावणे पोचले. त्यासंबंधाने मी आपला आभारी आहे.

व्याकरण, कोश व ठरीव लेखन पद्धती ही भाषेच्या उन्नतीची मुख्य अंगे असून ती उशिराने का होईना, परिषदेने स्वीकारली याबद्दल संतोषपूर्वक मी चालकांचे अभिनंदन करतो. व्याकरणासंबंधाने दादोबा पांडुरंगांचे अभिनंदन चालू आहे हे ठीकच होय, परंतु त्याबरोबरच कृष्णशास्त्री गोडबोले यांच्या सुंदर व्याकरणाची बहुधा विस्मृति झाल्याचे पाहून मला मोठा खेद वाटतो. मराठीत शास्त्रशुद्ध व्याकरण लिहिण्याचा पहिला प्रयत्न माझ्या मते कृष्णशास्त्री यांचा असून त्यानंतर तोच प्रयोग दामले यांनी विस्तृत केला. अद्यापि गोडबोल्यांचे व्याकरण मुख्य पाया म्हणून स्वीकारण्यास योग्य आहे असे मला वाटते. बडोद्यास तीस वर्षे राजपुत्र विद्यालयात शिक्षकाचे काम करीत असता मी मराठी व्याकरणाचा विशेष व्यासंग केला होता. मुख्यतः मराठीतील कालांची योजना निश्चित करून ती मी पुष्कळ वर्षांपूर्वी शाला-

पत्रकांतून वगैरे प्रसिद्ध केली होती. परंतु अलीकडे दुसरे विषय हाती घेतल्याने मी व्याकरणासंबंधाने आता बॅकनंबर बनलो असून परिषदेत भाग घेण्यास मी योग्य नाही अशी माझी प्रामाणिक भावना आहे. हातातील कामे बाजूस सारता येत नाहीत अशा निकडीची आहेत. शिवाय पुण्यास रात्री न राहता येथून परिषदेस हजर राहण्यास गाड्यांची सोय नाही म्हणून मी तो बेत रहित केला आहे. आपल्या सर्वांबरोबर मी आहेच असे समजावे, आणि जे काय निर्णय परिषद ठरवील ते मी आपल्या कृतीत आनंदाने स्वीकारीन. आपले कार्य यशस्वी व्हावे अशी चिंतनिका सारखी मनात वाळगीत आहे. हे पत्र माझे मित्र रा. कुळकर्णी, रा. कर्वे, रा. दामोदरपंत देसाई यांस दाखवून हजर न राहिल्याबद्दल सर्वांनी क्षमा करावी असे विनवितो. लो. क ही विनंति.

**गो. स. सरदेसाई**

श्री

ता. २९।४।४३ पो. कामशेत
जि. पुणे

कृ. सा. न. वि. वि. आपल्या सूचनेप्रमाणे भाषण लिहिण्याच्या तयारीत आहे. त्यासाठी मला स. १९०९ सालच्या बडोद्याच्या संमेलनाची थोडी हकीकत पाहिजे. त्या संमेलनाचा सेक्रेटरी मी असून सर्व काम व व्यवस्था कै. रमेशचंद्र दत्त व महाराज यांच्या हुकमतीने चालली होती. सर्व हिंदुस्थानातून मोठमोठे पाहुणे महाराजांनी मुद्दाम बोलावले होते. त्या वेळच्या नामांकित विद्वानांची यादी संमेलनास हजर असून भाषणे वगैरे केलेल्यांची असेल तर ती मला पाहिजे. त्या संमेलनाचा रिपोर्ट छापलेला होता. मीच तयार केला होता. त्याची प्रत मजजवळ नाही. आपल्या कचेरीत असेल तर मजकरिता अल्प वेळ पाठवावी. पाहून परत करीन. ती प्रत परिषदेच्या संग्रही नसेल तर ठळक पाहुण्यांची व विद्वानांची यादी तेवढी मला पाहिजे. मुख्यतः संमेलनाने काय काम करावे याची दिशा सयाजीराव व दत्त यांनी ठरवून दिली तिचा तपशील मला पाहिजे. पोतदार संमेलनाचा वृत्तान्त लिहीत आहेत त्यात असेल. रा. चिं. ग. कर्वे यांचेमार्फत आमचे दूधवाल्याबरोबर विनाखर्च येऊ शकेल. तसदी माफ.

**गो. स. सरदेसाई**



अनुक्रमणिका







ता. ११ एप्रिल
सन १९४३

वानजी निवास,
संदर्स्ट रोड वेस्ट
मुंबई ४

रा. रा. वामनरावतात्या जोशी,
अध्यक्ष महाराष्ट्र साहित्य परिषद,
मु. पुणे यांसी,

कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. आपले पत्र ता. ७ चे इतिहास परिषदेचे अध्यक्षस्थान स्वीकारण्यासंबंधाचे आले ते पोचले. आपण योजलेल्या सन्मानाबद्दल व आपल्या कळकळीच्या नियंत्रणाबद्दल मी आपला व समस्त परिषदेचा अत्यंत ऋणी आहे. मजकडून माझ्या आवडीच्या विषयाची थोडीबहुत सेवा घडेल अशी संधी चालून आलेली फुकट घालवू नये असे कितीही मनात असले तरी याक्षणी माझी शारीरिक व मानसिक स्थिती मला ही जबाबदारी स्वीकारण्यास अनुकूल नाही.

सुमारे दीड महिन्यापूर्वी संसाराची दीर्घकालची सोबतीण सोडून गेल्यापासून मी सर्वथा पंगू बनलो आहे. त्यात निद्राभंग व अशक्तता उत्पन्न होऊन त्राण वाटत नाही. हवा व उद्योग यांच्या दृष्टीने कामशेतलाच राहणे अवश्य असता, केवळ औषधोपचाराचे सोयीसाठी बंधूंनी मला येथे आणले आहे. मुंबईचे जिणे अत्यंत कष्टावह आहे. आपण इतक्या वर्षे विधुरावस्था कशी कंठिली याचे मला आश्चर्य वाटते. पूर्वीप्रमाणे उत्साहाने कामकाज करू लागलो म्हणजे आपण सांगाल ती कामगिरी मी यथाशक्ती संतोषाने स्वीकारीन, पण आज तसा भरंवसा वाटत नाही. झेपेल एवढेच काम अंगावर घेण्याचा माझा स्वभाव आपणास माहीत असेल. नगरच्या साहित्य संमेलनाचे अध्यक्षस्थान मी याच कारणास्तव स्वीकारले नाही. त्यास चार वर्षे झाली आणि आता तर असहाय झालो.

म्हणून माझी अशी सूचना आहे की मी बरा असलो तर मजकडून अपेक्षित असलेले कोणतेही काम परिषदेस हजर राहून मी करीन, भाषण लिहीन, सूचना करीन, पण अध्यक्षपणाची जबाबदारी दुसऱ्या कोणावर ठेवावी. कोणाच्याही हाताखाली काम करण्यास मला मात्र हानि वाटणार नाही. तूर्त मी बाहेर कोठे जाणार नसल्यामुळे सोयीचा दिवस आपण वाटेल तो ठरवावा. मे महिन्यात काही काळ पुण्यासच राहवे असा विचार करीत आहे. पण याची किल्ली डॉक्टरांचे हाती आहे.

दुसरा एक विचार सुचतो की आपल्या पत्रांत काम काय करायचे, कोणते प्रश्न विचारासाठी घ्यायचे, इतिहास म्हणजे सर्व जगाचा, की हिंदुस्थानचा, की

मराठ्यांचा याची स्पष्टता नाही, त्यामुळे आपल्या परिषदेत कोणता प्रश्नांचा खल करायचा याचा बोध होत नाही. मला वाटते बोलणे, भाषणे, चर्चा, याजपेक्षा प्रत्यक्ष कामेच पुष्कळशी तटलेली आहेत. त्यासाठी दहा पाच किंवा जास्त इसमांनी निर-निराळी कामे वाटून घेऊन ती प्रत्यक्ष सिद्धीस नेणेच अवश्य आहे. कामासाठी मी स्वत: पुण्यास राहण्यास तयार आहे. पण अशी कामे स्वत: सर्वांनी एकत्र करण्यास अंग मोडून बसले पाहिजे. मी तीन महिने पावेतो या कामी माझा वेळ देऊ शकेन. दोनतीन दिवसांच्या शाब्दिक चर्चेने काही निष्पन्न होईल असे मला वाटत नाही. तथापि आपणही या विषयी विचार केला असेलच. काम करणारांची यादी आपण करावी.

भा. इ. सं. मंडळाचे चिटणीस श्री. चि. ग. कर्वे व प्रो. जोशी यांजबरोबर वरील बाबतीत माझा थोडा बहुत विचारविनिमय झाला आहे. आपणास योग्य वाटल्यास त्यांच्या आपल्या विचारे एक कार्यक्रम निश्चित करावा आणि त्यात मजकडून आपली काय अपेक्षा आहे ती कळवावी, म्हणजे त्या दिशेने मला वागता येईल.

मात्र हे सर्व माझ्या प्रकृतीवर अवलंबून आहे हे सांगणे नकोच. आपण मुंबईस कधी आल्यास समक्ष बोलू.

परिषदेच्या नावाची विचक्षणा मला अनाठायी वाटते. काम करणेच महत्त्वाचे आहे. पत्रोत्तर यावे. लोभ निरंतर ठेवावा. ही विनंती.

**गो. स. सरदेसाई**

चौधरी बिल्डिंग

शिवाजी उद्यान
नाशिक दि. ५–६–१९६२

सप्रेम निवेदन वि. वि.

परवाच पाटणकरांच्याकडे आपली आठवण निघाली. त्याचबरोबर प्रा. वसंतराव कानिटकर हे वाईला प्रिन्सिपॉल म्हणून जाणार ही एक प्राज्ञ–वार्ता ऐकली होती तोही विषय निघाला, आणि आज आपले हे पत्र आले. पू. नानांचा व माझा दृढ परिचय होता असे नाही. त्यांचे पुत्र रामकृष्णपंत व वासुदेवराय यांनाच नानांच्या हयातीत मी बिचकत असे. एकदाच मनाचा हिय्या करून मी नानांना समक्ष भेटलो. एरव्ही त्यांना दुरून पुष्कळ वेळा पाहिले आहे. बैठकीतील त्यांच्या गोष्टी ( लहानपणी ) अधूनमधून ऐकल्या आहेत. नानांच्याकडे साहित्यिक कवी आले म्हणजे कुतुहलाने आम्ही लहान मुले जात असू. कवि कसा असतो ते बघत असू. एखादे वेळी छापखाना बघायला जात असू, जळगावातला एकुलता एक छापखाना ! मला नक्की आठवते की हा छापखाना बघायला मी एकदा बाळू मर्ढेकरला घेऊन गेलो होतो. त्यावेळचे बोलणे आठवणे अशक्य, परंतु छापखाना

पाहून झाल्यावर भिंतीवर पडलेल्या शाईच्या डागामधे तो काही आकृती बघत उभा राहीला होता. असो. पू. नाना हे अगदी नियमाने आमच्या जुन्या गावातील राममंदिरात दर्शनासाठी यायचे. ते दिसले की त्यांना नमस्कार करण्याची संधी आम्ही साधत असू. असो, त्याच्या संबंधी मी लिहू शकेन, परंतु साहित्यपत्रिकेत बसेल असा भारदस्त लेख माझे हातून उतरणार नाही. नानांच्याबद्दल मला बरीच माहिती आहे. प्रसंग डोळ्यासमोर उभे आहेत. ह्यावरून नानांचे चित्र मी उभे करू शकेन. एवढेच. दि. २० जूनच्या आत आपल्या हाती येईल या अंदाजाने लेख पाठवीत आहे. अधूनमधून ( त्या लेखांत ) विद्वानासारखेही लिहिण्याचा प्रयत्न करीन. जन्मशताब्दी साजरी करीन एवढे मात्र नक्की ! कळावे लोभ असावा.

आपला
**सोपानदेव चौधरी**

चौधरी निवास
शिवाजी उद्यान
नाशिक १
दि. १-१०-६८
विजयादशमी

सप्रेम निवेदन वि. वि.

आपले पत्र मिळाले, साहित्यलक्ष्मीचा जन्मशताब्दि समारंभ साहित्य परिषदेतर्फे साजरा करीत आहात याबद्दल अभिनंदन ! मातोश्री लक्ष्मीबाई टिळक यांचा जन्म १८६८ साली झालेला आहे; परंतु जन्मदिवस खुद्द त्यांनाच माहीत नव्हता. तरीपण ज्या दिवशी त्यांनी ख्रिस्ती धर्म स्वीकारला तो दि. ८ जुलै त्यांचा जन्मदिवस मानला जातो. त्या दिवसाप्रमाणेच त्यांची जयंती साजरी होत असते. यादृष्टीने दि. ८-७-१९६८ रोजी ( गेल्या जुलैमधे ) त्यांचा येथे नाशकास जन्मशताब्दि समारंभ साजरा झाला. गावोगावी होत आहे. साहजिकच मी ठाणे येथील मराठी ग्रंथ संग्रहालयात आयोजित केलेल्या समारंभानिमित्त व्याख्यानासाठी जात आहे. आपण यावर्षी येत्या डिसेंबरच्या आत समारंभ आयोजित केला तर ते शोभून दिसेल.

मध्यंतरी बऱ्याच वेळा पुण्याला येऊन गेलो होतो. ' गृहलक्ष्मी ' घरी होत्या, परंतु गृहनारायण बाहेर गावी गेले होते. त्यांची आठवण काढीत उत्कृष्ट चहाचा आस्वाद घेत तो ग्रहण केला. कळावे, लो. वि.

आपला स्नेहांकित
**सोपानदेव चौधरी**

ता. क.

एका ख्यातनाम संस्कृत पंडितेला संस्कृत साहित्यातला एक हरपलेला नाटककार गवसला. आम्हां नाटक तमाशांच्याकडे भाराभर नाटके येतात. ह्यातील शेकडा नव्याण्णव मराठी नाटककार कायमचे हरवले (साहित्यदृष्ट्या) तर किती चांगले होईल. नाटके कशी लिहू नयेत याचा माझा खूप अभ्यास झाला आणि– आणि मी एक ' बिनपात्री–बिनप्रेक्षकी ' नाटक लिहिले. पांढऱ्या कागदावर पांढऱ्याच शाईने !

साहित्य लक्ष्मी शताब्दिनिमित्त मुंबई साहित्य संघ, मधु कॉलेज, चाळीसगाव येथे माझी व्याख्याने झालीत. आता ठाण्याच्या मराठी ग्रंथ संग्रहालयात आहे. हे जे लिहिले ते ' महाराष्ट्र साहित्य परिषदेने बोलवावे, या दुष्ट हेतूने नव्हे !

श्री

फाळक्याचे घर, कपू
लश्कर ( ग्वाल्हेर )
१२–२–३३

कृ. सा. न. वि. वि.

आपले ता. ७–२–३३ चे पत्र पोचले. महाराष्ट्र विद्यापीठाच्या संस्थापनेसंबंधी जी समिती नेमण्यात आली आहे तिच्या सभासदांत माझे नाव प्रविष्ट करण्यात आले असल्याचे आपण कळविले. तरी उत्तरी विनंती की माझी यास संमती आहे. कळावे, कृ. लो. असावा ही वि.

आपला
**भास्कर रामचंद्र तांबे**

श्री

फाळक्याचे मंदिरानजीक
कंपू–लश्कर ( ग्वाल्हेर )
१९–३–३३

रा. रा. ना. गो. चाफेकर यांचे सेवेसी,

कृ. सा. न. वि. वि.– आपले ता. १७ चे पत्र पोचले. महाराष्ट्र विद्यापीठासंबंधी नेमलेल्या समितीची प्रास्ताविक सभा ईस्टरमध्ये कोठे तरी पुण्यास किंवा मुंबईस भरविण्याची आपली योजना आहे. अशी सभा भरविणे अवश्यच आहे, परंतु ईस्टरच्या सुमारास मजवर सरकारी कामाचा बोजा फार असतो आणि मी संस्थानच्या परीक्षांचा कार्यवाह असल्यामुळे माझे सारे काम गुप्त स्वरूपाचे असते त्यामुळे ते मजशिवाय दुसऱ्या कोणास सोपवणे शक्य नसते. याच सुमारास एकामागून एक परीक्षा येतात व मला कोठेही जाणे किंवा रजा मिळणे शक्य नसते. म्हणून मला हजर राहता येणार नाही याबद्दल वाईट वाटते. पण एखादा सभासद

गैरहजर असल्याने काम अटकणार नाही असे मला वाटते. कार्याला आता आरंभ केलाच पाहिजे.

कळावे, लोभ असावा ही वि.

आपला
**भा. रा. तांबे**

श्री
गाढवे यांचे घर, ब्रँच पोस्ट ऑफिसजवळ
नवा बाजार, लश्कर, ( ग्वाल्हेर )
३०।९।३८

कृ. सा. न. वि. वि–

आपले ता. २७।९ चे कृपापत्र पोचले. बडोदा सरकारला पाच 'नामांकित ग्रंथकारांची' व्याख्याने करविण्याची असून त्यासाठी १२ नावे आपण सुचवली. त्यात माझ्या नावाचा समावेश केल्याबद्दल मी आपला फार आभारी आहे. परंतु माझी प्रकृति अलीकडे इतकी क्षीण झाली आहे की घराच्या बाहेर पडणेही मला अशक्य झाले आहे. अशा स्थितीत प्रवासाची दगदग सोसणे असंभवनीय आहे. यासाठी माझ्याऐवजी आपण कोणा दुसऱ्या गृहस्थाची योजना करावी. आपल्या कृपेची याप्रमाणे फेड करण्याची वेळ यावी ही खेदाची गोष्ट आहे. पण काय करावे ? नाइलाज आहे. कळावे, लोभ असावा ही विनंती.

आपला
**भा. रा. तांबे**

वर लिहिलेल्या परिस्थितीत माझ्या लेखांची यादी पाठविण्याची गरज नाही हे उघडच आहे.

**भा. रा. तांबे**

बडोदे
ता. १३।२।४०

सा. न. वि. वि.

आपले जा. क्र. ३०७ चे कार्ड पावले. १९४० साल संपावयास अकरा महिने बाकी आहेत. ते संपेपर्यंत मी बाकीदार होऊ शकत नाही; पण काही तरी खुसपट काढून पुण्याबाहेरच्या मतदारास उडवून देण्याचा परिषदेचा नेहमीचा डाव असल्यास माझे नाव पटातून कमी करावे. मताधिकार न दिल्यास १९४० ची वर्गणी

मी देणार नाही. वर्गणी संम्मेलनाच्या वेळी देईन. मग माझे मत जमेस धरा वा न धरा.

कळावे, लो. अ. हे. वि.

आपला

**चिंतामण विनायक जोशी**

श्री पुणे ता. २०–११–५९

सा. न. वि. वि.

गुजराती लेखाचा अनुवाद करण्याबद्दल मानधन देण्याचा आपला विचार कळाला. ४८ फू. स्के. कागद आहेत. पन्नास रुपये मानधन मला पुरे होईल. कारण लेखकाचा पगार व स्टेशनरीला २५ रु. लागतील. माझ्या मेहनतीबद्दल २५ रुपये अशा हिशेबाने माफक मानधन मागत आहे. अधिक दिल्यास आभारी होईनच; पण ५० तरी पाहिजेत.

आपला

**चिं. वि. जोशी**

गणेश गंगाधर जांभेकर लोकशिक्षण कार्यालय

संपादक–लोकशिक्षण सदाशिव पेठ, पुणे २

ता. ३०।८।३७

नमस्कार वि. वि. घटना पाहिली. ती मान्य आहे. मात्र घटना ही शक्यतो बदलणारी गोष्ट नसल्यामुळे तिची भाषा शुद्ध असणे अवश्य आहे. 'कुबेर' शब्द चुकीचा होईल. 'कोषाध्यक्ष' म्हणावे. 'संयुक्त'पेक्षा जोडचिटणीस बरा. 'शाखेची विशेष सभा' यात 'विशेष साधारण सभा' पाहिजे. 'नोटीस' अद्यापी चालणारच काय ? रीतसर सूचना, पूर्वसूचना चालणार नाही काय ? त्याचप्रमाणे 'गणसंख्या' हा चांगला शब्द, रुढ असता पुन: 'कोरम' कशाला ? 'मार्फत' 'मंजूर' यांना 'द्वारे' 'संमत' हे योग्य शब्द आहेतच. तात्पर्य, भाषाशुद्धी किंवा शुद्धीकरण हा केवळ संमेलनातील कडाक्याच्या वादाचाच विषय नाही– त्यावर नित्याच्या लेखन भाषणांत कटाक्ष प्रत्येकाने ठेवला पाहिजे, हे उघड आहे. असो– घाईने हे दोन शब्द लिहीत आहे. कळावे.

**गणेश गंगाधर जांभेकर**

श्री आनंद कार्यालय, पुणे

ता. १७।१।३०

रा. चिटणीस 'महाराष्ट्र साहित्य परिषद' यांस नमस्कार वि. वि.

परवा ता. १९ रोजी भरणाऱ्या परिषदेच्या सभेस हजर राहण्यास दुखण्या-

मुळे मी असमर्थ असल्यामुळे आपण विचारलेल्या प्रश्नावर मी माझे मत लेखी पाठवीत आहे. ते असे की, यंदाच्या साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद प्रथम रा. खाडिलकर व त्यांनी न स्वीकारल्यास रा. वामन मल्हार जोशी यांस द्यावे असे मला वाटते. कळावे लो. अ. हे. वि.

आपला

**वा. गो. आपटे**

श्री. दत्तो वामन पोतदार — पुणे, १३।३।४०

अध्यक्ष मराठी साहित्य संमेलन,

पुणे

शि. न. वि. वि.

पत्र लिहिण्यास कारण की कानडी भाषेत पारिभाषिक शब्द व इंग्रजीतून आज वापरल्या जाणाऱ्या काही शब्दांचे ( जसे wireless वगैरे ) समानार्थक शब्द बनविण्याच्या कामी मी थोडेसे काम करीत आहे. मराठी साहित्य परिषदेने या बाबतीत काही काम केले असून एक शब्दकोश तयार असल्याचे ऐकले आहे. आपण मला एक प्रत पाठवाल तर फार उपकार होतील.

. मी ही गोष्ट काकासाहेबांना सांगितली तेव्हा त्यांनीही एक प्रत पाहिजे असे त्यांनी सांगितले. तेव्हा त्यांनाही एक प्रत पाठविण्याची कृपा करावी.

पत्ता :- रंगनाथ दिवाकर — आपला

हुबळी — **दिवाकर**

श्री — सांगली

२।५।१९४३

सा. न. वि. वि.

आपणाकडून आलेले 'प्रसिद्धीपत्रक १' आणि निमंत्रणपत्र पोचले. 'इतिहास आणि ललित वाङ्मय' यासारख्या भारदस्त विषयावरील चर्चेत भाग घेण्याची मजसारख्या कानाकोपऱ्यात पडून राहिलेल्या मनुष्याची आपण काय पात्रता पाहिली न कळे. तथापि आपल्या आज्ञेला मान देणे अवश्यच असल्यामुळे आपल्या इच्छेनुसार वरील विषयावर एक निबंधवजा टांचण सादर करीत आहे.

प्रत्यक्ष वाङ्मय संमेलनास मला हजर राहता येईल की नाही हे आज सांगवत नाही. माझा पाय मुरगळला असून त्याला थोडी सूजही आहे. तरी सुद्धा ता. ५ मे पासून पुढे सुमारे १५ दिवस पुण्यास बुद्धिबळाचे सामने होणार आहेत. त्यांत भाग घेण्यासाठी मी पुण्यास येत आहे. अर्थात सुमारे २० तारखेपर्यंत तरी माझा मुक्काम 'जॉली क्लब, मुंजाबाचा बोळ, नारायण पेठ' येथे आहेच. पण या



अनुक्रमणिका

सामन्यात हिंडण्या–फिरण्याचे श्रम जवळजवळ पडणारच नसल्यामुळे मी या सामन्यात भाग घेणार आहे. परंतु पुढे लवकरच जे आपले 'वाङ्मय संमेलन' भरणार त्यात मात्र हिंडणे फिरणे आणि प्रसंगी उभे राहून बोलणे असा विविध प्रकारचा ताण पायावर पडणार असल्यामुळे पाय चांगला झाला असला तरच मला संमेलनात भाग घेता येईल असे वाटते. ही सर्व परिस्थिती लक्षात घेऊन तूर्त आपण माझ्या निबंधवजा टाचणावरच समाधान मानून घ्यावे अशी विनंती आहे. हे टाचण मी पुण्यास एक दोन दिवसात आल्यावर आपणाकडे पाठवून देतो. कळावे, लोभ असावा ही विनंती.

आपला

**गो. गो. मुजुमदार**

( साधुदास )

५८ शनवार, पुणे २

७।१०।४७

सा. न. वि. वि. चरित्रकोशाचे कार्य पूर्ण होऊन वर्ष होत आले. ग्रंथाची विक्री समाधानकारक आहे. लवकरच आर्थिक जबाबदारीतून मुक्तता होण्याची शक्यता आहे. या ग्रंथावर मराठी, हिंदी व इंग्रजी भाषांतून झालेले मतप्रदर्शनही समाधानकारक आहे. तथापि अशा ग्रंथाबाबत अधिक लक्ष वेधेल असे प्रयत्न करण्याची फार आवश्यकता आहे. म्हणून आपल्या परिषदेने पुढील गोष्टी कराव्यात असे सुचवावेसे वाटते.

१) एखादे स्फुट लिहून अशा प्रयत्नांची आवश्यकता लोकांना पटवून देणे.

२) अशा कार्यांचे मूल्यमापन व पुढीलांना मार्गदर्शन.

३) अशा ग्रंथांचा अभ्यासक्रमात समावेश.

४) असे ग्रंथ पाहण्याकडे प्रवृत्ति वाढविणे.

५) अशा ग्रंथांना उद्देशून परीक्षेत काही प्रश्न काढणे.

६) कोशावर व्याख्याने व चर्चा करणे.

७) प्रत्येक प्राथमिक शाळेत कोश पोचतील अशी व्यवस्था करण्याबद्दल सरकारला विनंती करणे.

८) कोशातील दोष दाखवून त्यात सुधारणा करण्याची व्यवस्था.

९) कोणत्या कोशांची आवश्यकता आहे हे लक्षात आणून देणे.

१०) कायमच्या कोशसमितीची स्थापना.



अनुक्रमणिका

आमच्या मध्ययुगीन च. को. च्या पुनर्मुद्रणाची वेळ लवकरच येणार आहे. तसेच प्राचीन ग्रंथ, स्थल, परिभाषा वगैरे कोशही छापखान्याची मार्गप्रतीक्षा करीत आहेत. अशा कामी आपल्या संस्थेचे मार्गदर्शन मिळावे म्हणून मुद्दाम हे पत्र लिहीत आहे. उत्तर यावे ही विनंती.

आपला

**सिद्धेश्वरशास्त्री चित्राव**

मुंबई, ९ फेब्रुवारी १९५०

सा. न. वि. वि.

आपले क्र. १३४८ चे ५ तारखेचे पत्र मिळाले. शुद्धलेखनाचे नियम ठरविण्याचा अधिकार साहित्य परिषद व विद्यापीठ यांचा आहे. ते काम सरकारचे नाही. परिषदेतच लोकमत नसल्यास विनाकारण वादविवाद माजण्याचाच संभव अधिक आहे असे मला वाटते. कळावे,

आपला

**बा. गं. खेर**

**श्री. वा. दा. गोखले**
चिटणीस, महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रोड, पुणे २

163 D Hindu Colony
Dadar, Bombay DD
Oct. 14th 1969

स. न. वि. वि.

आपले दि. ९ ऑक्टोबरचे पत्र पोचले.

आपण प्रकाशित करीत असलेल्या संग्रहात डॉ. केतकरांचे अध्यक्षीय भाषण विनामूल्य छापण्यास मी परवानगी देत आहे.

कळावे, लोभ असावा ही विनंती.

आपली

**शीलवती केतकर**

रा. रा. कार्यवाह,
महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक पथ, पुणे ३०

गुलटेकडी सॅलिसबरी पार्कजवळ
पुणे—१
२ ऑगस्ट १९६६

अ. नमस्कार, वि. वि.

आपले १९।७।६६ चे पत्र पोचले. माझे नाव संमेलनाच्या अध्यक्षपदासाठी



अनुक्रमणिका

सुचवून आपण माझा जो गौरव केला आहे त्याबद्दल मी आपली अत्यंत आभारी आहे. पण आपली सूचना मला स्वीकारता येणे शक्य नाहीं. तेव्हा माझे नाव यादीतून काढून टाकावे अशी नम्र पण आग्रहाची विनंती आहे.

इतर चार नावे मातबर आहेत. मी बहुतेक निवडून येणार नाहीच तेव्हा नाव असावयास हरकत काय ? माझ्या नावामुळे पॅनेलची भरती होते ही गोष्ट खरी पण आपल्याकडे स्त्रीदाक्षिण्य खूप आहे. कदाचित बाई म्हणून मी निवडून आले तर भयंकर पंचाईत होईल. तत्त्वत: निवडणूक लढवण्याला वा अध्यक्षाचा मान स्वीकारायला माझा विरोध नाही; पण वर म्हटल्याप्रमाणे चुकून निवडून आले तर ह्या वर्षी व पुढील वर्षी हे काम मला झेपणे शक्य नाही. पूर्वी अंगावर घेतलेली कामे एवढी आहेत की त्यातून पार पडायला मला ९ महिने / वर्ष लागेल तेव्हा नवी जबाबदारी स्वीकारणे अशक्य आहे–

तरी कृपा करून माझे नाव यादीतून काढून टाकावे.

आपली
**इरावती कर्वे**

मुंबई
६।२।७७

प्रिय श्री. दीक्षित,

सप्रेम नमस्कार. पत्र मिळाले. साहित्य परिषदेविषयीची आपण लिहिलेली माहिती कळली.

मी सदस्य झालो नाही, कारण या प्रकारच्या कोणत्याही संस्थेचे सदस्यत्व न घेण्याचे धोरण मी मागे ठरविले आहे. पत्रकार परिषद वा नाट्यपरिषदेचाही सदस्य मी नाही.

तरीही अगत्यपूर्वक आपण मला लिहिले याबद्दल मनःपूर्वक आभारी आहे.

कळावे, लोभ रहावा.

तुमचा
**विजय तेंडुलकर**

---

**प्रवासवर्णन**

- विसरू म्हणतो विसरेना – काळे विजया, श्रीविद्या प्रकाशन, २५० शनिवार पेठ, पुणे ३०, १–१९८९, मूल्य ५० रु.
- जपानगाथा – सोनवणे एन्. जे. कॉंटिनेन्टल प्रकाशन, विजयानगर, पुणे ३०, १–१९८९, मूल्य ३५ रु.

---



अनुक्रमणिका

**रसिक समीक्षक–टीकाकार**

# श्री. के. क्षीरसागर यांना आलेली पत्रे

डोंबिवली
१२।४।३७

गुरुवर्य क्षीरसागर यांस

सा. न. वि.

पत्र मिळाले. आजच मनीऑर्डर करीत आहे. तुमच्या दुधाची व्यवस्था चांगली होईल. टॉमॅटो चालतात तर इतर फळेही चालू शकतील. याबाबत तुम्ही संकोच बाळगू नये. मला त्यात कोणचीच अडचण नाही. पहिला विषय मराठी काव्यातील प्रेम हाच ठेवतो. दुसरा विषय वाङ्मय लिहिण्यातील व वाचण्यातील हेतू हा ठेवत आहे. यापेक्षा ताण पडणारे कार्यक्रम कोणचेच ठेवीत नाही. फक्त रविवारी सकाळी एकच प्यालावर चर्चा ठेवतो. ती चारसहा जणांसाठीच. तुम्ही शुक्रवारी सकाळीच जरूर या. मी कल्याणला येईनच. तत्पूर्वी पत्र यावे. तीन दिवस परठिकाणी रहावयाचे म्हणून संकोच करू नये. केतकरांवरील Booklet च पाहिजे आहे. अधिक भेटी अंती. कळावे.

आपला,
**गोविंद**
(गोविंद तळवळकर)
१६।४।४७
ता. २१।२।४९

गु. क्षीरसागर यांस,

सा. न. वि. वि.

रॉयवरील तुमचा लेख मिळविण्यासाठी मी जंगजंग पछाडले. येथील डॉ. सवनीस यांच्याकडे नेहमी 'नवयुग' येतो तेव्हा तो वाचावयास मिळलच असे वाटले. पण नेमका त्याच दिवशी नवयुग त्यांच्याकडे आला नाही. इतरही ठिकाणी शोध केला. पण तो मिळाला नाही. अखेरीस आजच्या Independent Indiaमध्ये त्याचे भाषांतर वाचले व तो भाषांतरीत लेख तुमच्याकडे धाडत आहे. खुद्द तुम्ही भाषांतर केले असते तर ते याच्याहीपेक्षा किती तरी सरस झाले असते. पण या स्वरूपात का होईना तुमचा लेख वाचावयास मिळाल्याने नेहमीचा आनंद लुटलाच. रॉयच्या नव्या भूमिकेचे सार तुम्ही फार थोडक्यात पण फार सुंदर रितीने सांगितले



अनुक्रमणिका

आहे. निवडणुकबाज पुढाऱ्यांना त्याची भूमिका कळणे अशक्यच आहे. आणि तरीही गोऱ्यांसारखे साथी कृष्णमूर्ति, अरविंद इत्यादींनी हिंदुस्थानची विनाशाप्रत चाललेली नीतिमानता सुधारावी म्हणून डांगोरा पिटतीलच. पण त्यांना रॉयचे म्हणणे पचनी पडणार नाही. रॉयच्या हल्लीच्या भूमिकेशी माझ्या वृत्तीमुळे मी बराच समरस झालो आहे. तुम्ही रॉयवर याहीपेक्षा विस्तृत लिहिण्याची अत्यंत आवश्यकता आहे. रॉयच्या इंग्रजीबद्दल तुम्ही काय लिहिलेत ते या लेखावरून कळले नाही. या 'ऑबजेक्टिव्ह' रॉइस्टांना त्याचे महत्त्व वाटले नसेल.

तुमची हैद्राबादवरील स्वारी कशी काय पार पडली? माझी तुमच्याबरोबर येण्याची अत्यंतिक इच्छा होती. तुम्ही येण्याबद्दल मला विचारलेत यातच मला किती अभिमान वाटला तर खुद्द येऊ शकलो असतो तर किती अभिमान वाटला असता याची कल्पना करणेही शक्य नाही. पण माझा अर्थातच नाईलाज होता.

कल्याणचा मराठे तुम्हास ठाऊक आहेच. तो फणसीकर यांस असे म्हणत होता की 'क्षीरसागरांचे वाङ्मय वाचून मगच मला आयुष्यात काही स्वारस्य आहे असे वाटू लागले. त्याच्या वाङ्मयाच्या वाचनाने माझ्या जीवनात क्रांति झाली आहे.' माझी व त्याची यानंतर भेट झाली नाही. ही क्रांति झाली म्हणजे काय झाले हे मी त्याचेकडून काढून घेणार आहे.

येत्या 'वसंत' मध्ये तुमचा लेख येणार आहे तो पाहीनच. येत्या नवयुगात कशावर लिहिणार आहा? 'शरच्चंद्राच्या स्त्रिया' या विषयावर लिहिणार असे तुम्ही म्हणाला होता. एखाद्या मासिकात त्यावर लवकर व जरूर लिहा. कळावे. सोबत Independent India चा अंक धाडला आहे. तो न मिळाल्यास कळवा. दुसरा धाडून देईन.

आपला
**गोविंद**
**(गोविंद तळवळकर)**

रा. स. दाते
बी. ए. एल्. एल्. बी.
आय्. ए. एस्.

३, मार्तंड चौक
ता. १२।५।५९

श्री

श्री. क्षीरसागर यांस सप्रेम नमस्कार.

आपल्या अध्यक्षतेखाली साजऱ्या होणाऱ्या मराठी साहित्य संमेलनास मला जातीने हजर राहता येत नाही ह्याबद्दल फार वाईट वाटते. नुकसानीत मीच राहणार आहे.

आपली अध्यक्ष म्हणून निवड झाली त्याबद्दल इंदूरची महाराष्ट्र साहित्य सभा व व्यक्तिशः मी आपले सहर्ष, हार्दिक अभिनंदन करीत आहेत. ह्या मान आप-

णास ह्यापूर्वीच मिळावयास हवा होता, पण थोड्या उशिरा का होईना, आपल्या वहुमूल्य साहित्य सेवेचे व प्रतिभेचे योग्य चीज, अखिल महाराष्ट्रातीलच नव्हे, तर वृहन्महाराष्ट्रातीलही साहित्य–प्रेमी जनतेने केले आहे.

उत्तरोत्तर आपणाकडून माय-भापेची अधिकाधिक भरीव सेवा होत राहो व आपणांस दीर्घ-आयुरारोग्य लाभो, अशी आम्हा सर्वांची प्रभूचरणी प्रार्थना आहे.

मी गेल्या मार्चमध्ये पुण्याला गेलो होतो, व आपली चौकशी केली होती. पण आपण निवडणुकीच्या मोहिमेवर वाहेर गावी गेला असल्याचे कळले.

केव्हा तरी, आपणास इंदूरला येण्याची तसदी घ्यावी लागेल. हे ही सुचवून ठेवितो.

संमेलनास सुयश चिंतितो.

आपला
स्नेहांकित
राममंय्या दाते
(अध्यक्ष, म. सा. सभा, इंदूर)

प्रा. क्षीरसागर
अध्यक्ष, मराठी साहित्य संमेलन,
मिरज

श्री

शुक्रवार
१५।४।६६

साईनाथ–प्रसन्न

"श्रीभूषण"
१ ला माळा
गणेश पेठ–लेन
दादर
मुंबई–२८ डी. डी.

श्री. क्षीरसागरसाहेव यांस

सादर–सप्रेम नमस्कार. आपले तावडतोव उत्तर आले व त्यांत सुचविल्या-प्रमाणे श्री. हरीभाऊ मोटे ह्यांनी श्रीमती सौ. शिरीप पै ह्यांना सांगून 'मराठा'-तर्फे आपण 'स्वनातीत'चे परीक्षण पाठवावे असे विनंति-वजा पत्र पण आपणांस काही दिवसापूर्वी मिळाले असेलच. माझ्या विनंतीला मान देऊन आपण जे सौहार्द व जिव्हाळा प्रकट केला त्यावद्दल मी आपला अंतःकरणापासून आभारी आहे. मध्यंतरी श्री. हरीभाऊ मोटे गावाला गेले होते. ते परवाच इथे परतले व त्यांनी मला कालच सांगितले की– श्रीमती शिरीप पै चे पत्र आपल्याला गेले आहे. हे कळल्यावरच आपल्याला उत्तर पाठवावयाचे असे मी मनात योजिले होते. म्हणून आपल्याला उत्तर साभार पोहोच देण्यास येवढा विलंव लागला.

तुम्ही एप्रिलचे सुरवातीस मुंवईला येऊन गेला असाल. मला वांद्र्याला एक चांगला प्रशस्त Flat अलीकडे मिळाला आहे व तिकडे Shift होण्याच्या मी गड-वडीत होतो. दादरचा Flat पण कायम ठेवला आहेच परंतु, इथला टेलिफोन,

वांद्रचाला transfer झाला, म्हणून इथे आता टेलिफोन नाही. वांद्र्याचा टे. नं. ५३५५८१ आहे. आपण पुन: आता मुंबईस याल तेव्हा मला अगोदर कळवून ठेवा मी आपण उतरला असाल तिथून आपणास माझे घरी घेऊन येण्याची व्यवस्था करीनच.

'टीकाविवेक'ची एक प्रत परवा विकत घेतली, त्याच्या वाचनात गर्क आहे. 'अप्रतिम' ग्रंथ आहे. टीकाशास्त्र व कला ह्याचा स्वत:च हा ग्रंथ एक बहारदार नमुना आहे. मराठी भाषेतील एक हिरा आहे. अधिक काय लिहू ?

आपला.
स्नेहांकित
रामूभैय्या

श्री

डोंबिवली
२।३।७२

स. न. वि. वि.

आपले दि. २८।२ चे वृत्तपत्र पावले. रजिस्टर बुक–पोस्टानेच पुस्तक पाठवितो. आपणास पुस्तक आधीच मिळावयास पाहिजे होते. आपण 'ललित'मध्ये 'महाराणी पद्मिनी'विषयी लिहीत आहात ह्याविषयी आभार मानतो. 'धरती' मासिकातही ह्या विषयावर विस्तृत परीक्षण आपणाकडून हवे आहे. त्यांचे तसे पत्र यथावकाश आपणास येईलच. आपण सवडीने लिहावयास घ्यावे. आता आपली प्रकृती बरी असेल अशी आशा आहे. मलाही नोव्हें. ७ पासून रक्तदाबाचा विकार जडला आहे. हे सर्व न टळणारेच आहे. बहुत काय लिहिणे ?

लोभ असावा, हे विज्ञापना !

आपला
पु. भा. भावे

श्री

डोंबिवली ( पश्चिम )
७।४।७२

स. न. वि. वि.

पुस्तकाच्या दोन्ही प्रती आपण ठेवून घ्याव्यात. 'ललित'चा प्रकार वाचून आश्चर्य वाटले नाही. पद्मिनीच्या परंपरेशी अनेकांचे वैर आहे. हे कोण परांजपे म्हणता त्यांचे पत्र जपून ठेवावे, हे सर्व आपण प्रसिद्ध करावयास पाहिजे. 'धरती'साठी आपण लिहिणार असल्याचे श्री. मंगळवेढेकर सांगत होते.












श्री. कोठावळे यांना त्यांच्या सहकाऱ्यांचे उपद्व्याप ठाऊक आहेत की नाहीत ते विचारणार आहे. असो. आपले आत्मचरित्र पूर्ण झाले का ? आता प्रकृती कशी आहे ? कुशल कळवीत असावे. लोभ असावा, हे विज्ञापना.

आपला

**पु. मा. भावे**

सौर चैत्र ८।१८९७

ता. २९।३।७५

सप्रेम न. वि. वि.

नुकतेच तुमचे एक छोटे पत्र प्रसिद्ध झालेले पावले. तुमच्या संग्रही असावी म्हणून माहिती देतो. हैदराबाद ( निजाम ) येथे निवृत्त न्यायाधीश श्री. गुंडूराव हरवनरे राहतात. फार वृद्ध पाणिनीय व्याकरण आणि अरबी भाषेचे उत्तम पंडित. कुराणाचे संस्कृत भाषांतर करीत होते. कदाचित इंडो–मॉस्लेमिकांत काही प्रसिद्ध झाला असावा. कौटुंबिक आपत्तीत दुःखी आहेत. मला अलीकडील ताजी खबर नाही. ६–७ वर्षांपूर्वी भेटलो होतो. पुण्यातही गाठीभेटी झाल्या होत्या. वैदिक संशोधन मंडळाचे श्री. ना. श्री. सोनटक्के यांची चांगली ओळख आहे. पुण्यात आणावे असा माझा अल्पसा प्रयत्न होता पण जुळले नाही. कळावे,

आपला

**दत्तो वामन पोतदार**

काय ? विद्यापीठे काय ? विद्यार्थी काय ? विद्येचा चुराडा– अगदी विपरीत काळ ! वीट येतो ! मन विपण्ण होते.

**द. वा. पो.**

सौर : चैत्र १२।१८९७

ता. २।४।७५

सप्रेम न. वि. वि.

लेखी पाहिजे तर लेखी आणि कायमचेच कळवितो, माझी पत्रे छापण्यास पूर्ण संमती आहे. गुप्त कारभारच नाही. असो. तुमची प्रकृती थोडी–जास्तच बिघडली तरी तुम्ही संयमी आणि चिवट आहात, भिऊ नका. एक मात्र स्पष्ट आहे की वय वाढते तशी दुर्बलता वाढते. तो सृष्टिधर्मच आहे. चिंता सोडा तोच एक मोठा रोग आहे. मी ७।४ ला पुण्यात आहे. राहीन दोनचार दिवस. विद्यापीठाच्या सभेला आलोच नाही. शोभा काय राहिली ? आम्ही भूतपूर्व ! आम्हाला नवीन कायद्यात डच्चू दिला आहे. मग ती पुणे विद्यापीठाने दिलेली पदवी आता संग्रहालयी वस्तू झाली. संग्रहालयात तरी कोण ठेवतो ?

आपला

**दत्तो वामन पोतदार**

किर्लोस्कर प्रेस
(प्रोप्रायटर्स : किर्लोस्कर ब्रदर्स लि.)
प्रकाशक : किर्लोस्कर, मनोहर, स्त्री मासिके
किर्लोस्करवाडी ( जि. द. सातारा )
३१।१।५१

सा. न. वि. वि.

'मनोहर'च्या संपादकांच्याकडे आलेले बडोद्याच्या वाङ्मय परिषदेच्या वेळी आपण केलेले अध्यक्षीय भाषण आज वाचावयास मिळाले. आपल्यासारख्या ज्येष्ठ व टीकाकार अन् विद्वान् मंडळींना पत्र लिहायचे म्हणजे संकोच अन् भीती वाटते. कारण विचारांच्या मांडणीप्रमाणेच ते लिहितानाही चुका होतात आमच्या हातून. याची जाणीव मनात असते.

तरीही धीर करून लिहीत आहे. आपल्या भाषणाचे वाचनच नव्हे तर मी मननही केले. मराठी भाषेच्या विकासाला अन् विस्ताराला, सामर्थ्याला अन् सौंदर्याला विघातक अशी जी कारणे व परिस्थिती ही जबाबदार आहेत त्यांची आपण केलेली मीमांसा अत्यंत मार्मिक व मार्गदर्शक, सखोल, सूक्ष्म अन् स्पष्ट आहे. आपल्या भाषणातील उत्तरार्धातील काही भाग मला तितकासा समजू शकला नाही, तो आपण कधी भेटाल त्यावेळी मी आपल्याला विचारीन. मराठी भाषेवरील प्रेम तथाकथित नवकाव्य (?) लिहून व्यक्त करण्यापेक्षा आपण ज्या भाषा प्रेमाने अन् तळमळीने आपले विचार व्यक्त केले आहेत, त्या तऱ्हेने व्यक्त करण्याचा प्रयत्न सर्वांनी करायला हवा असेच कुणालाही वाटल्यावाचून रहाणार नाही. पुरेशी उदाहरणे दिल्याने आपले विवेचन सुगम व सुस्पष्ट होण्यास मदत झाली आहे. आम्हा विद्यार्थी लोकांना तर फार मार्गदर्शक आहे ते भाषण ! आपल्याला अंत:करणपूर्वक धन्यवाद व आपले मन:पूर्वक आभार. कळावे,

आपली नम्र
**मालती किर्लोस्कर**

---

## संस्कृति विज्ञान

- **स्वातंत्र्याचे भय** – साळुंखे आ. ह., प्रका. महाराष्ट्र साहित्य आणि संस्कृति मंडळ, मुंबई, १–१९८८ मूल्य ३८ रु.

---

सरस्वति प्रसाद
१९६/८४ सदाशिव,
टिळक रोड, पुणे २
दि. ३।६।१९५९

प्रो. श्री. कृ. क्षीरसागर,
तुकारामाश्रम, शेडगेवाडी, सदाशिव पेठ, पुणे २
सा. न. वि. वि.–

तुमचे मिरजेचे अध्यक्षीय भाषण वर्तमानपत्रात जसे आले तसे मी पाहिले. संयुक्त महाराष्ट्राबद्दल तुम्ही काय बोलता याबद्दल जिज्ञासा होती. याबाबतचे तुमचे वक्तव्य मला फार आवडले. अभिनंदन करितो. मिरजेच्या हकिकती कानावर आल्या त्याही ऐकल्या. तुमच्यासंबंधी–तुमच्या अध्यक्षीय साक्षेपाविषयी फार चांगले ऐकले. समाधान वाटले. धन्यवाद. असो. तुमचे भाषण समग्र छापलेले असल्यास व प्रत देण्यासारखी शिल्लक असल्यास एक पाठवावी. असो.

अध्यक्षीय निवडणुकीचा धुरोळा बराच उडोला होता. आपले उभयतांचे जुने मित्र प्रा. शंकरराव कानेटकरांचा याबाबत घडलेला एकंदर इतिहास पाहून वाईट वाटले ! 'इदं चनास्ति, परं च न लभ्यते' अशी त्यांची मनाची अवस्था झाली असावी असे वाटते ! सार्वजनिक जीवनात असे कधी कधी व्हावयाचे– विशेषत: मुळापासून नि:संदिग्ध व खंबीर भूमिका नसल्यास–सं. म. च्या प्रश्नात अशी परवड अनेकांची झाली आहे–काका गाडगीळांचेही काहीसे तसेच नाही का ? त्यांच्या कोलांटघा, त्यांची धरसोड, त्यांचे 'सर्वनामी' प्रयोग–हे काय दर्शवितात ? असे माणसाचे घडू नये, माणसाने घडू देऊ नये – पण ते घडतेना, घडू दिले जाते ना ! आणि त्याच्या बुडाशी तरी काय असते ? नि:स्पृहतेचा अभावच ना ? महाराष्ट्रात तरी असे होऊ नये. पण ते होते– व त्याने विषण्ण वाटते. तुमच्याबाबतीत ते तुम्ही घडू दिले नाहीत याबद्दल समाधान वाटते. तुम्हास विशेष धन्यवाद. असो. केव्हा तरी भेट व्हावी. ही विनंती.

आपला,
**द. दे. वाडेकर**

---

**कोश**

- **उर्दू मराठी शब्दकोश** – संपा. जोशी श्रीपाद, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ मुं. ३२, किं. ५० रु.

---

'ममिता' (अमिता नव्हे)
४१/१ कर्वे मार्ग,
पुणे ४.
२।८।६३

मित्रवर्य क्षीरसागर यांस,

काल आपल्याकडून परतल्यावर सौ. यमूताई व मी मिळून घाटयांच्या पुस्तकांच्या परिक्षणाचे परिक्षण पुन्हा केले. त्यातील निष्कर्ष आपणास मनोरंजक वाटतील म्हणून खाली देत आहे.

आपण घाटयांच्या पुस्तकाचे परिक्षण नेहमीच्या मामुली परिक्षकाप्रमाणे केले नसून ते 'दिवस असे होते' हे वाचून उद्‌भवलेले विचार या सदरात येते. या प्रकारच्या लिखाणात पुस्तकाची समग्र व साकल्याने विचार करण्याची जबाबदारी लेखकावर नसते.

यादृष्टीने आपला लेख आम्हा उभयतांस फारच आवडला. विशेषत: माझ्यासारख्या माधवरावांच्या भक्तास व सौ. यमूताईसारख्या श्रद्धावान नातेवाईकास. आपण त्यांच्या जीवनातील अत्यंत नाजूक प्रसंगी त्यांच्या मित्रानी त्याना असे तोंडघशी पाडले याचे विवरण व तदनुषंगाने खरे प्रेम म्हणजे काय याचे विवेचन जे केले आहे ते 'बेहद्द' आहे. त्रिवार धन्यवाद !

आता 'परिक्षण' या दृष्टीने पाहिल्यास काय वाटते ते लिहितो.

घाटयांच्या जीवन वृत्तान्तात घाटे कसे दिसले याचा परामर्ष घ्यावयास हवा होता.

तसेच त्यानी ज्या बहारदार व्यक्तिरेखा हळुवार, प्रेमळ, उदात्त व दिलदार वृत्तीने रेखिल्या आहेत. त्याचा निर्देश हवा होता. त्यांच्या दोन्ही पत्नी, आजी, चंद्रशेखर यावरील प्रकरणे उल्लेखनीय आहेत. मराठी वाङ्‌मयात ती चिरंतन राहतील असे वाटते. आम्हा उभयतानाही वाचताना गहिवरून आले.

श्री. नाना रानडे यांनी आपले कर्तव्य अनंगाचे आहे अशी समजूत करून घेतल्याने माधवरावांचे जीवनात व कदाचित् त्या 'वरदा'चे जीवनातही – तिचा विचार कोणी करताना आढळत नाही– जी घातकारक ढवळाढवळ केली त्यावरील आपला राग योग्यच आहे. आपले हे प्रकरण–दोन्ही अर्थानी–त्यावरील विश्लेषणानी त्यावर कायमचा पडदा टाकील अशी आशा बाळगण्यास हरकत नाही. त्या अनुषंगाने 'प्रेम–प्रेम' ही काय चीज आहे याचेही आपण केलेले विवरण मराठी वाङ्‌मयात अपूर्व आहे. आपणच पूर्वी हे विश्लेषण केले असल्यास मी पाहिलेले नाही. माधवरावांच्या वृत्तीस भेकड ठरवणारे महाभाग, पराक्रमी लोकासही ते तेच म्हणणार यात शंका नाही. परंतु मातृभक्ती हीही कामदायतेतूनच उद्‌भवते या नव्या शास्त्रांपुढे दंडवत घालण्याकडे कोण काय करणार. घाटयानी

आपल्या परमप्रिय मित्राचेबाबतीत या प्रकरणी आपल्या नेहमीच्या दिलदारवृत्तीस मुरड घातली हे एक आश्चर्य होय. माधवरावांच्या मृत्यूनंतर ते भावभरे भाषण करणारे हेच घाटे काय ?

ग्रंथात पाने किती आहेत, छपाई कशी आहे, वाक्यरचनेत चुका आहेत काय, सनावळ्या बिनचूक आहेत का नाही, किंमत-योग्य वा अयोग्य अशा जातीच्या परिक्षणात आपले परिक्षण बसणे शक्यच नाही व त्याची जाणीव सत्यकथाकारास नाही असेही नाही. आपला लेख छापण्याचे नाकारून त्यानी स्वतःचेच नुकसान करून घेतले आहे.

घाटे, माधवराव व आपण स्वतः यामध्ये सारखाच स्नेहभाव व आदर वाटत असल्यानेही त्यांचे पुस्तक व आपलं परिक्षण यावर आम्ही दोघानीही इतका विचार केला आहे. दोन्हीही मराठी वाङ्मयात अपूर्व आहेत असा आमचा विश्वास आहे.

आ. स्नेहांकित

**मो. ज्ञा. शहाणे**

कोल्हापूर
२०।७।६४

स. न. वि. वि.

आज एका बाबतीत पत्र लिहून आपल्याला थोडी तसदी देत आहे. त्याबद्दल क्षमा असावी.

साहित्य अकादमी दरवर्षी पारितोषिकाला योग्य असे एक पुस्तक प्रत्येक भारतीय भाषेतून निवडते. ही निवड निश्चित करताना अकादमी साहित्यिक, साहित्यतज्ज्ञ व साहित्याशी निकट संबंधित मंडळी यांच्या सूचना मागविते. यंदाच्या पारितोषिकाला पात्र अशी जी पुस्तके सुचविणार असाल, त्यात 'स्वामी' कादंबरीचा बहुधा समावेश झाला असेलच.

'स्वामी' कादंबरी १९६२ साली प्रसिद्ध झाली. अकादमीच्या पारितोषिकाच्या दृष्टीने तिचे हे तिसरे म्हणजे शेवटचे वर्ष आहे. तिच्या गुणवत्तेसंबंधाने मी आपल्यासारख्याना काही लिहिले पाहिजे असे नाही. गडबडघाईत एखादेवेळी तिच्या नावाचा समावेश करणे राहून जाईल. तसे होऊ नये म्हणून हे पत्र पाठवीत आहे. केवळ एका चांगल्या ललितकृतीला न्याय मिळावा, एवढयाच हेतूने हे पत्र लिहिले आहे.

कळावे हे विनंती.

आपला

**वि. स. खांडेकर**

वसंत कानेटकर
२५।२।६६

स. न. वि. वि.

फार दिवसांनीं (की वर्षांनी ?) मी हे पत्र तुम्हाला लिहीत आहे. तसे कारण निमित्तमात्रच आहे. गेले काही दिवस मी माझी कामे संभाळून तुमच्या 'टीकाविवेक 'चे वाचन करीत आहे आणि एका अपूर्व आनंदात डुंबत आहे. या ग्रंथाबद्दल संपूर्ण वाचनानंतर मी पुन्हा लिहिनच. पण वाचता वाचताच तुम्हास धन्यवाद देण्याची उबळ अनावर झाली म्हणून ग्रंथ दूर सारून ही 'दाद' देत आहे. तसे तर तुमचे सगळेच लिखाण माझे भारी आवडते आहे. 'उमरखय्यामची फिर्याद' हा माझा विशेष आवडता ग्रंथ. तुम्हास कळविण्यास आनंद वाटतो की या ग्रंथातील मीराबाईविषयींचा आपला लेख माझ्या एका चित्रकथेच्या निर्मितीस फार उपकारक झाला आहे. श्री. व्ही. शांताराम ('इथे मराठीचिये नगरी') या चित्रपटानंतर आता ज्या **'जलबिना मछली'** हिंदी चित्राकडे वळत आहेत त्याची कथा संवाद मीच लिहिले आहेत. त्या कथेतल्या प्रणयिनीचे चित्र रेखाटताना आपण केलेले मीराचे हृदयविश्लेषणच नव्हे तर तिचा एक अभंगही (भाषा बोले वचन विचारी साधो की संगत दुखभारी...) मी वापरला आहे. त्यातले (जन्म-जोगीण मीरा) काही परिच्छेदही मी मुद्दाम शांतारामबापूंना वाचून दाखवले होते. अशा रीतीने साहित्य सेवेच्या बालपणी आपण आणि आपले लेखन जे 'दैवतरूप' घेऊन मजसन्निध आलात ते इतक्या वर्षानंतरही अभंग आहे याचे फार समाधान वाटते. दैवताच्याबाबत सहसा असे घडत नाही म्हणून या अनुभवातील अपूर्वाई मुद्दाम सांगायची. तुमच्यावर एक सविस्तर लेख लिहावा असे माझे मित्र शंकर सारडा कैक दिवसापासून मला आग्रह करीत आहेत व मीही त्यांना होकार दिला आहे. पण त्यासाठी आवश्यक त्या स्वास्थ्याची मी थोडी वाट पहात आहे. कारण मला पुष्कळ काही लिहायचे आहे. व्यक्तिशः नाटककार म्हणून मी घडत असतांना आपण रुजविलेली शेक्स्पीयर प्रीति तर मला अमोल ठरली. पण आता लक्षात येते की आपण रुजविलेल्या केतकरभक्तिमुळे जीवनाकडे बघण्याची एक असाधारण चोखंदळ दृष्टी मला प्राप्त झाली. 'ब्राह्मणकन्या' आणि 'गोंडवनातील प्रियंवदा' या कादंबऱ्या शिकवताना म्हणूनच मी वर्गात 'रस' निर्माण करू शकलो व माझ्या विद्यार्थ्यांनी वारंवार मला श्रेय द्यावे असे मी त्यांना काही देऊ शकलो. तुमच्या एकूण सर्वच लेखनाचा मजवर खोल ठसा उमटला आहे हे अनेकदा माझ्या ध्यानात येते. यादृष्टीने आपण माझी 'रायगड' आणि 'मत्स्यगंधा' ही नाटके आवर्जून पहावीत अशी विनंती करीत आहे. ह्या सर्व श्रेयाबद्दल लवकरच मी माझी एक कलाकृती आपणास नम्रतेने अर्पण करणार आहे त्यास आपण संमती द्यावी. तसेच **'जिजाई'** आणि **'इथे ओशाळला मृत्यू'** (संभाजीची अखेर) ही माझी नाटके

लिहून होतील त्यावेळी शिवचरित्रातील एक पर्वच मी पुरे करीत असल्याने, माझ्या एखाद्या नाटचकृतीस आपण प्रस्तावना लिहावी ही देखील विनंती करून ठेवीत आहे.

फार दिवसात आपली भेट झालेली नाही. व्हावी असे वारंवार वाटतेच. पण नाटक आणि चित्रपट लेखनाच्या भोवऱ्यात गरगरत असल्याने पुण्याकडे येणे फार करून घडत नाही. पण आता येईन त्यावेळी जरूर भेटेन. माझे इथे ठीक चालले आहे. लेखनावर (नाटच आणि चित्रपट) द्रव्यार्जनही चांगले होत आहे. लवकरच मी इथे माझा स्वतःचा बंगला बांधावयास घेत आहे. तुम्हास माझे विशेष कौतुक म्हणून हे सांगत आहे. येत्या चारपाच वर्षांत मी करारमुक्त (pledge) झालो की नोकरी सोडून लेखनास वाहून घेण्याचा संकल्प करीत आहे.

असाच लोभ ठेवावा आणि विश्रांतीसाठी नाशकास कधीतरी मुद्दाम मजकडे चार आठ दिवस यावे ही आग्रहाची विनंती. कळावे. सवडीने पत्रोत्तर यावे.

आपला

**वसंत कानेटकर**

निर्मलकुमार फडकुले
सदस्य– विधिसभा आणि विद्वत्परिषद
शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर

१४५ रेल्वे लाईन्स,
सोलापूर–१
दिनांक २५।३।१९७०

श्री. माननीय,

प्रा. श्री. के. क्षीरसागर यांना सविनय नमस्कार वि. वि.

आपला 'जाती–पोटजातीबद्दल अर्धवट समज' हा 'तरुण भारतातला' लेख वाचला. जाती आणि जातिक यांच्याकडे सध्या फारच ढोबळ दृष्टीनं पाहिलं जातं. आपण अशा अर्धवट मतांचा समाचार घेतला हे उत्तम झालं. आपल्या लेखनाचा मी एक चाहता आहे. 'आपलं' 'केसरीतलं' लेखन वाचण्याची इतकी सवय जडली होती की आता चुकल्यासारखं वाटतं. आपण 'तरुण भारत' मधून नियमित लेखन करावं ही नम्र विनंती करतो. आपल्या विचारशुद्ध लेखनामुळं माझ्याप्रमाणेच अनेकांच्या विचारांना चालना मिळून, निरनिराळ्या प्रश्नांचा नवीन दृष्टीनं वेध घेण्याची प्रवृत्ती वाढली. आपले 'सहजसंवाद' 'हितगुज' यासारख्या सदरातून आपण जे लेख लिहिले ते विचार व शैली यांच्या दृष्टीनं अत्यंत नावीन्यपूर्ण असून मराठी साहित्यात त्यांना स्वतंत्र स्थान मिळावं अशी त्यांची योग्यता आहे. लोकहितवादींच्या 'या पत्रांनी' जसा एक इतिहास घडवला, तसा विक्रम या प्रकारच्या आपल्या लेखांमुळं घडत आहे, असं मी म्हटलं तर मी स्तुतीचे शब्द लिहीत नसून केवळ वस्तुस्थितीची दखल घेत आहे असंच मानावं.

आपला एक वाचक म्हणून मी इतकीच अपेक्षा करतो की आपलं विचार-प्रवर्तक ( विचारप्रक्षोभकही ) लेखन नियमितपणानं वाचायला मिळावं.

कळावे.

आपला नम्र

**निर्मलकुमार फडकुले**

श्री

स्वातंत्र्य

पुणे ४

७।२।७१

श्री. श्री. के. क्षी यांस,

सप्रेम नमस्कार वि.

आपली रवींद्रनाथ स्मारक व्याख्यानमालेतील रवींद्रनाथ ठाकूरवरील मुद्रित व्याख्याने वाचून मनास एक अनिर्वचनीय आनंद झाला व त्याचे वातावरण अजून मनावर आहे. तुम्ही यात रवींद्रनाथ जसे सोदाहरण उलगडून दाखवले तसे मला कोणी विवेकानंद, रामकृष्ण, अरविंद दाखवतील का ? अशी पुस्तके हवी, छोटी सोपी व तन्मयतेने लिहिलेली, निदान त्यासारखी. मला ओढ आहे.

आपणास विनंती की मला असं एक विवेकानंदांसंबंधी पुस्तक सांगा व जयकर ग्रंथालयांतून ते मला काढून द्या.

मी शुक्रवार ता. १२ ला दुपारी २ चे सुमारास ग्रंथालयांत येतो त्यावेळी आपण कृपया सौ. क्षीरसागर यांनी किंवा दुसऱ्या कोणी मला ते द्यावे अशी व्यवस्था करावी.

पुनः एकवार मनाचा आनंद व्यक्त करतो. कळावे, वि.

आपला

**रा. वि. ओतुरकर**

३ क ४९ जय-विजय

एक्सप्रेस हायवे,

विले-पार्ले (पूर्व), मुंबई-५७

३०।११।७४

शि. सा. नमस्कार, वि. वि.

मध्यंतरी मी परगावी गेलो होतो, त्यामुळे आपली पत्रे माझ्या हाती उशिरा पडली.

आपल्या भाषणाची टिपणे मी करून ठेवली होती, पण ती आता सापडत नाहीत. आपल्या व्याख्यानाचे सूत्र मला पक्के स्मरते आहे. अर्वाचीन मराठी

काव्यातले प्रणयभावनेचे चित्रण कसकसे बदलत गेले आणि तांबे यांची प्रेमकविता ही वेगळी कशी, हे आपण आपल्या भाषणात सुस्पष्ट केले. गोविंदाग्रजांच्या प्रेम-कवितेतील Confession माधव जुलियन यांच्या प्रेमकवितेतील glorification यांचा थोडक्यात परामर्श घेऊन तांबे यांच्या प्रणयभावचित्रणातील परमनःप्रवेश आणि तादात्म्य यांचे रूप आपण विशद केले होते तांबे यांच्या प्रेमकवितासंबंधी बोलताना आपण जगू तांबे होऊनच बोलत होता. 'घट तिचा रिकामा झऱ्यावरी' आणि 'घट भरे प्रवाही बुडबुडुनी' या दोन गीतांच्या संदर्भात आपण एकूणच प्रेमभावनेसंबंधी आपले मनोगत बोलून दाखवीत होता. आपल्या साऱ्या भाषणाला आत्मस्पर्शी अनुभव सौंदर्य लाभले होते. Creative, Criticismचा तो एक मनोहर नमुना होता. या जातीचे भाषण हल्ली दुर्मिळ झाले आहे.

'साहित्यसंधा'त आपण कवी म्हणून भास्करराव तांबे यांच्यासंबंधी आपणास नेमके काय भावते ते अशाच मुक्त शैलीत सांगावे, ही विनंती.

कळावे.

घरी सर्वास यथोचित.

आपला नम्र
**व. दि. कुलकर्णी**

श्री

ग. रा. खंडकर
१०८/३० बंगले १४६४
टी. टी. नगर भोपाळ ४६२००६
९।११।७८

श्री. के. क्षीरसागर, यांस आदर अर्पण.

आपले ऑगस्टमध्ये लिहिलेले व नंतर अपूर्ण राहिलेले सविस्तर पत्र पावले. लिफाफा पाहूनच प्रथम समाधान. पत्र वाचण्यापूर्वी मात्र शंका कुशंका अस्वस्थ करणाऱ्या होत्या. गेल्या दोन महिन्यात असा काही चमत्कारिक योग आला की माझे ७।८ मित्र व हितचिंतक अंथरुणात पडले. स्नेहबंका डबघाईला येतात की काय या भयशंकित मनात–दहतिमना नाना शंका कुशंका.

एक मित्र स्नेहद्रोह करून स्वर्गी गेलाच. वर्षभरात असा सामुहिक वज्राघात दुसऱ्यांदा. पहिल्या आक्रमणाबद्दल मला अंधुक आठवण येते की आपल्याला मी कळविले होते. तूर्त सर्व शाबूत.

आता ७२ व्या वर्षी नव्याने स्नेह जमणे क्वचितच शक्य. तसे मन आतुर असते; पण मन मिळणे कपिलाषष्टीचा योग.

येथे मी, पत्नी, भावजय, नात असे राहतो. धाकटा भाऊ इंदुरास व फिरती-

वर असतो. त्याने साम्यवादी राजकारणास वाहून घेतले आहे. 'वढता कारवा' म्हणून साप्ताहिक गेले पाच वर्षे त्याच्या संपादनाखाली निघते. तो आला म्हणजे चौफेर चर्चा होते. समान ध्येयमूल्यांनी व भावनांनी आम्ही बांधलेले आहोत. आर्थिक अडचणींची मातब्बरी त्यामुळे भासत नाही. पत्नी व भावजय या याच वातावरणात संसार करतात. ते सुख मोठे.

माझे घर शहरापासून दूर ( म्हणजे गायकवाड वाड्यापासून औंध गावाइतके ) आहे. शिवाय कोणाकडे जावेसेच वाटत नाही. 'अपने जगे पे मस्त हैं रंगे जमाल यार. (किसने) देखा तो क्या हुआ, न देखा तो क्या हुआ' अशा भावनेतच एक प्रकारची रग मनात शिरली आहे. मार्क्सवादाने जीवनदर्शन साडेतीन तपापूर्वीच दिले. तो संतोष वृद्धिगत होतच आहे. अंगी–मनी लोणकढे तूप पचल्यासारखी रग वाढते आहे.

मोठ्या उंच इमारतीत वरच्या मजल्याकडे चढण्यास धावते चढाव असतात. उभे राहिले की माणूस वर आपोआप चढतो. मला चढता चढता एखादी पायरी उडी मारून आणखी वर जावेसे वाटते. ( हा चढता जिना मार्क्सवादाचा )

सरकारी वाचनालयात मात्र बहुधा रोज जातो. दिल्लीकडील इंग्रजी–हिंदी वर्तमानपत्रे येतात. त्यावर व स्नेही–हितचिंतक यांच्या येणाऱ्या पत्रांवरून मानसिक गुजराण चालली असते.

वाचलेल्या मजकुरावर भाष्य लिहून पाठविणे हा नाद जडला आहे. 'युगांतर' साप्ताहिक, पुण्याचे 'तात्पर्य' यात एकाद दुसरे पत्र प्रसिद्ध होते. तेवढाच आनंद.

आपण मला पत्र लिहिता यात केवळ स्नेहसंग्रह वृत्तीच मला दिसत नाही. कोठे तरी नवी, उच्च, समृद्ध मूल्यांचा शोध वा ठाव आपण घेत आहात असे मला उमजते. आपल्या वयात ही ओढ म्हणजे शैशव संपले नसण्याचे शुभ चिन्ह होय. बहुधा ह्या ध्यासामुळे आपले स्नेही ( मी भक्त म्हणवून घेतो)जन आणखी बरीच वर्षे आपल्या ऋणात राहणे इच्छित असतील.

आपले अलिकडचे लेख वाचावयास मिळाले तर या साहित्यिक वाळवंटात पपय–धाराच पावल्या वाटतील. मासिके आली तर मी परत करीनच. पण तेवढे कष्ट कोणास पडतील एवढे उमजून भार टाकण्यास संकोच होतो.

माझी प्रकृति तूर्त उत्तम आहे. पथ्य पाळण्याच्या निश्चयावर कुपथ्य अधूनमधून पचते. ययातिपण प्रसंग साधून उचल खाते. 'मन ओढाळ ओढाळ जसे पळे 'नाठाळ ढोर' किंवा 'अचपळ मन माझे नावरे आवरिता' जनता पार्टी झाली आहे.

सौ. शकुंतलाबाईंना सादर नमस्कार.

आपला

**ग. रा. खंडकर**

॥ श्री ॥

सह्याद्री सोसायटी
अंधेरी (प.) मुं. नं. ५८
२९।५।५९

श्रीयुत श्री. क्षीरसागर यांसी,

आदरपूर्वक नमस्कार, वि. वि.

'सुवर्णतुला'च्या नव्या आवृत्तीतील काऊंट टॉलस्टॉयवरील लेख वाचला. आवडला. टॉलस्टॉय हा माझा जिव्हाळ्याचा विषय आहे. त्यासंदर्भात मी ८ दिवसांपूर्वी आपणाशी फोनवरून वातचीत केली होती. मराठी मंडळींचे टॉलस्टॉयविषयक कुतूहल जागृत करण्याचा हेतू त्या लेखाने बरोबर साधलेला आहे. My Confession मधील निवेदनाचा सारांश चांगल्या संदर्भात दिलेला आहे. धन्यवाद !

मी सध्या 'टॉलस्टॉय–एक माणूस' नावाचे सविस्तर ( ५५० पानाहून मोठे ) पुस्तक लिहिले आहे. सध्या त्या पुस्तकाची छपाई सुरू आहे. पुस्तकाचे साधारण स्वरूप लक्षात यावे म्हणून प्रकाशकांनी माझ्या तीन लेखांची पुस्तिका तयार केली आहे. ती सोबत धाडीत आहे. त्यावरून माझा व माझ्या पुस्तकाचा किंचितसा परिचय आपणास होऊ शकेल.

'अखेर' या लेखाच्या पट्टीत सर्व पुस्तक लिहिले आहे. पहिले दोन्ही लेख प्रकाशकांच्या सांगण्यावरून–पुस्तक लिहून झाल्यावर–लिहिलेले आहेत. हे तिन्ही लेख मूळ ग्रंथात समाविष्ट नाहीत– फक्त एकंदर ग्रंथाचा आवाका समजण्यापुरते आहेत. आपण जरा नजरेखालून घालावे, व आपले मत कळवावे.

आपली
**सौ. सुमति देवस्थळे**

ता. क.

भारतगौरवमालेतर्फे प्रसिद्ध झालेले टॉलस्टॉयचे पंचखण्डात्मक चरित्र मी वाचलेले आहे. ते पुस्तक १९१९ साली लिहिलेले आहे. त्यावेळी टॉलस्टॉयची एकूणएक पत्रे व दैनंदिन्या व इतर अपरंपार संदर्भग्रंथ तयार झालेले नव्हते. A. Maude च्या चरित्राची ती एक अतिसामान्य प्रतिकृती आहे. ते पुस्तक संपूर्णतया outdated आहे व अनेक मर्यादांनी बद्ध आहे. म्हणून माझा हा नवा प्रयत्न.

**सौ. देवस्थळे**



अनुक्रमणिका

Judge Supreme Court
INDIA
11, Tughlak Road,
New Delhi
13th May 1959

My dear Ksheerasagar,

I am writing this letter to you to offer you my sincere congratulations on your election as the President of this year's Marathi Literary Conference. Since I do knot now your precise postal address at Poona I have requested Kakasaheb Gadgil to deliver this letter to you on my behalf.

It is now many many years after we parted from each other; but during all this time I have been watching your career with warm interest bordering on affection and with very keen appreciation. The first part of your life was full of stress and strain; then came your illness which cast an ugly shadow which filled all your friends with grave apprehensions; your stout will-power and self-discipline, however, conquered your illness and it seemed as if you were reborn. Then began your career as a Professor, loved and respected by the students, a literateur with a vision and definite progressive ideas on literary, social and cultural problems. It was during this part of your career that you were blessed a sweet though short-lived interlude of happy married life; and when cruel fate suddenly brought to an end this happy interlude you began to pursue your literary career with double zest and with a sense of dedication. From a distance I have watched all these phases with very great interest and I recall them today when your merit has received just recognition from the literary public of Maharashtra. In memory of good old days let me offer you my sincere congratulations.

On this occasion I would also like to express my prayerful hope that Providence may bestow you with long, healthy and active life and that all the best hopes and expectations of the very large circle of your friends and readers should be fully satisfied by the speech that you will deliver as the President of the Conference and by the articles and books that your powerful pen may produce hereafter.

If possible do send me a copy of your Presidential



अनुक्रमणिका

address and such of your other works as may be readily available.

Congratulations once more.

Yours Sincearly
( P. B. Gajendragadkar )

Prof. S. K. Ksheerasagar,
Tukaram Ashram,
Poona.

**( श्रीकेक्षींनी डॉ. व. दि. कुलकर्णी यांना लिहिलेले पत्र )**

पुणे
१३-११-६३

श्री. व. दि. कु. यासी स. न. वि.

तुमचे सविस्तर पत्र आज मिळाले. वास्तविक या सहामाहीत मी आरंभी-पासूनच 'टीकाविवेक'चे उरलेली प्रकरणे पुरी करण्याकडे लक्ष द्यावयास हवे आहे. तथापि येथे एक पुतणी एम्. ए. करता आली आहे; दुसरीच्या वरसंशोधनाकरिता बंधू मध्यंतरी आले होते; ता. ६ रोजी दरसालप्रमाणे काही करणे, ता. ९ ला मुंबईला जाणे इ. मध्ये अद्याप माझी नवी सहामाही सुरूच होत नाही. त्यामुळे तुमचे पत्र येताच तुमच्या प्रश्नांना उत्तरे देणे उरकून घेत आहे. परवा तुम्हाला मोघम 'सकाळी येत आहे' असे लिहिले त्यामुळे तुम्हाला हेलपाटा पडला. असो. मी लगेच दुसरे दिवशी सकाळीच निघाल्याने आणखीही काही मंडळींना हेलपाटा पडला. मी ज्यांच्याकडे उतरलो होतो, त्या बाईची आणि माझी पूर्वीची ओळख नव्हती. ज्या हायस्कूलसचे संमेलन होते, त्यांच्या सोयीकरिता अनोळखी ठिकाणी उतरावे लागले. त्यामुळे त्यांचे काम संपल्यानंतर तेथे राहणे मला स्वतःला प्रशस्त वाटले नाही. असो. तुम्हाला निमंत्रण-ता. ६ चे पाठविणे मला युक्त व अपरिहार्य वाटले; तुम्ही येऊ शकणार नाही हे गृहीतच धरले होते.

**आता तुमच्या प्रश्नांची उत्तरे**

पहिली गोष्ट म्हणजे एकटयाने ती सूत्रमय संदर्भयुक्त सुफीपर्णे वाचूनही, तुम्ही त्यातील प्रेम-कल्पनेचे व प्रेमसिद्धांताचे पुष्कळच चांगले आकलन केलेले दिसत आहे. मी स्वतः संदर्भ आणि विचारसूत्र सांगणे जरूर आहे व शक्यही आहे; परंतु माझ्या मदतीशिवाय-एखादा समानधर्मा का होईना, त्यात कितपत शिरू शकतो, हे मला तुमच्या या प्रयोगावरून अंदाजता आले, हा एक फायदाच होय.

(१) 'सुफी पर्णे' प्रायः सर्वच्या सर्व ऑगस्ट १९३४ ते डिसेंबर १९३४ च्या दरम्यान लिहिली गेली. केवळ एक दोनच १९३३ च्या अखेरीस लिहिली गेली होती. (त्यातील एखादे हरवलेही आहे) १९३३ मधील 'पर्णं'नी माध्यम निश्चित झाले; व १९३४ ऑगस्ट पासूनच्या घटनांनी विषय, moods आणि तीव्रता पुर-

विली. अर्थात त्यामागे अनुभव आहे व तो अनुभव म्हणजे 'राक्षस विवाहा' मागील अनुभवाचाच पुढचा अंक म्हणता येईल. या अनुभवांतून म्हणजेच व्यक्तींतून, प्रेरणा मिळाली. तथापि त्याच्या आधीच ( म्हणजे १९३४ च्या आधी ) आणि 'राक्षसविवाहा'चा पूर्वार्ध 'प्रगति' साप्ताहिकातून प्रसिद्ध होत असता म्हणजे १९३० ते १९३२ मध्ये इंग्रजी तत्त्वज्ञानाचे वाचन झाले. त्याच्याही आधी म्हणजे १९२५ ते १९३० पर्यंत इंग्रजी काव्याचे वाचन झाले होते. भावनेतून अनुभव येत असतानाच काव्याचे वाचन;–आणि निराशांचे आणि मानवी स्वभावांचे अनुभव येत असतानाच तत्त्वज्ञानाचे वाचन, असा समांतर क्रम होता. 'Genius' किंवा स्वतंत्र प्रज्ञेचा मनुष्य, आणि त्याच्या 'वेगळेपणा' मुळेच त्याच्या वाटयाला येणारे क्लेश; सामान्य लोकांचा सामान्यपणा, तथाकथित बुद्धिमंतांची पोटभरू दृष्टि या सर्वांसंबंधी शोपेनहॉरने इतके स्वच्छ लिहून ठेवले आहे की, माधवराव पटवर्धनांसारख्या सरळ Genius ला ज्या अनुभवांनी धक्का बसला, ते अगदी क्रमप्राप्त समजण्याइतकी माझी तयारी शोपेनहॉरने करून दिली. किंबहुना paradoxically असेही म्हणता येईल की, शोपेनहॉरच्या आग्रही, स्वयंकेंद्रित आणि निराशावादी तत्त्वज्ञानाचे जणू माझ्या विचारांच्या train ला तांबडया कंदिलाने Line Clear दिल्याने, निराशामय अनुभवांतूनही मी आशावादी तत्त्वज्ञान– निदान ध्येयवादी, श्रद्धावादी तत्त्वज्ञान–जमवीत, रचीत चाललो.

शोपेनहॉर आणि नीत्शे यांचे वाचन १९३० ते १९३४ पर्यंत विशेष झाले. मी वाङ्मय म्हणून 'सुफीपर्णे' लिहिली असती, तर ती मराठीत लिहिण्याचा यत्न केला असता. अक्षरश: हृदय रिते आणि डोके शांत करण्याचा मार्ग म्हणूनच ती लिहिली गेली. व अशा Cathartic effect करता समुचित शाब्दिक आविष्कार अपरिहार्य होय. व तो इंग्रजी free verse मध्येच मिळणे शक्य होते.

जीवनाची ही अवस्था सामान्य भाषेत 'कमल भक्षणा'चीच म्हणावी लागेल. पण भक्षणार्थ कमल मिळाले, तरीही जी उत्कटता, अनुभूतिपिपासा व अभिव्यक्तीची धडपड सोडीत नाही, अशा अशांत जीवाचे कमलभक्षणही वेगळे असते, असे तुम्हाला म्हणावे लागेल. 'तरी त्यात स्वप्नरंजन नाही; त्यात एक austerity आहे' या आपल्या निष्कर्षात, मी काय म्हणत आहे ते आले आहेच.

अर्थात या लेखनप्रकारावर रवींद्रांचा मुळीच ठसा नाही. (जरी माझ्या जीवनाच्या १९३० पूर्वीच्या पर्वात रवीन्द्र हे माझे आवडते लेखक होते, तरी त्यांचे काव्य मला कधीच आवडले नाही. त्यांच्या कथा व कादंबऱ्या माझ्या आवडत्या होत्या.) उत्कट Concentrated आणि लयबद्ध गद्य लिहायचे, म्हणजे इंग्रजीतच लिहिले पाहिजे, अशी माझीही स्थिती होती, आणि – माझ्या नम्र मते – मराठी गद्याचीही स्थिती होती. आणि पद्य, – यमक गणमात्रायुक्त पद्य – तर आपण कधीच लिहीत नाही ! मुक्तछंद लिहिणाऱ्या आजच्या दीड शहाण्यांना मी पूर्वी-

पासून मूर्तात काढीत असलो, तरी धगधगते अनुभव गणमात्रांत बसवणे मला स्वतःला तरी नेहमी हास्यास्पदच वाटलेले आहे. निदान माझे त्यावेळचे अनुभव वृत्तांत बसविण्याइतका मला धीर नव्हता. पण ज्या इंग्रजी Rhythmic concentrated poetic शैलीत ते आज आढळतात, ती शैलीही सर्वथा परंपराहीन आहे असे नव्हे.

ती परंपरा कुणाची ? अर्थात नीत्शेची. नीत्शेने प्रेमावर अर्थातच लिहिले नाही. उत्कट आकांक्षा, उत्कट निराशा, दुर्दम्य अहंकार हे त्याचे विषय. अन् तो मुद्दाम archaic शैलीतही लिही.

मला वाटते, तुमच्या पहिल्या पाच प्रश्नांची उत्तरे माझ्या उपरिलिखित आत्मकथनात—क्रमाने नसली तरी—आली आहेत. तुमचे पहिले पाचही प्रश्न, relevant ही आहेत आणि प्राथमिक आकलनाचेही द्योतक आहेत.

काही 'पर्णा'ना शीर्षके देण्यात सयुक्तिकता असेल अगर नसेल; सहेतुकता व सोय मात्र आहे. ही पर्णे १९३४, १९३५ साली दोनतीन हप्त्यांनी type करून घेतली. त्यांच्या माथ्यावरील आकडे हे क्रमाचे आहेत असे नव्हे. अर्थात क्रमभंग हा 'पर्णलोपा'चा द्योतक नव्हे—जरी सुमारे तीन पर्णे या संग्रहात अन्तर्भूत नाहीत.) दोन हरवलेली आहेत, व एक हिंदी चतुष्पदिका इंग्रजी टायपिंगमध्ये आलेली नाही.

होय, सुफी पर्णांच्या भागांना दिलेली तीन नावे काहीशी सार्थ आहेत. Leaves in the Dust हे केवळ विनयसूचक आहे. Suphi plaint आणि My crusade ही नावे अर्थपूर्ण आहेत. काही पर्णे प्रेमभावनेच्या अनुभवातून, विश्लेषणातून व आनंदातून निघाली; काही प्रेममूलक 'फिर्यादी'तून (plaint मधून) निघाली. काही पर्णे शरीरपूजक (materialistic) युगातील प्रेमविटंबनेविरुद्ध अध्यात्मवादी प्रेमिकाने पुकारलेल्या धर्मयुद्धाची तुतारी म्हणून लिहिली गेली. आणि तरी ती सर्व सारख्याच वजनाची, सारख्याच 'pitch' मधील, व समान शैलीतील आहेत असे नव्हे. काही पर्णे, भावनायुक्त पण गद्य Diary सारखी देखील आहेत.

प्रकाशनाला अडचणी तीन :— एक म्हणजे इतके उत्कट, इतके वैयक्तिक आणि इतके वास्तव—अथवा more correct,—इतके स्वानुभवप्राय—असे लिखाण महाराष्ट्रीय 'विद्वानां'ना पचेल काय ? त्यांची Prudery आणि त्यांचे Philistinism वर उफाळून येऊन त्यातील उत्कट आणि प्रामाणिक भावनेचा अवमान करण्याला उद्युक्त होणार नाही का ? दुसरे म्हणजे ज्या इंग्रजीत ते लिहिले आहे ते प्रभावी आणि काव्यमय असले, तरी त्यांतील भाषिक दोष मलाही जाणवतात. (रवीन्द्रांच्याही prepositions च्या आणि articles च्या चुका त्यांच्या इंग्रज चरित्रकारांनी दाखविल्या आहेत ! ) तिसरे म्हणजे त्यातील 'Diary वजा' भाग



अनुक्रमणिका

गाळावा की ठेवावा हे ठरेना–अन् चौथे म्हणजे व्यावहारिक कार्यक्षमतेचा आणि कार्यनिश्चयाचा अभाव !

आपला ११ वा प्रश्न 'सुफीपर्णे हा आत्माविष्कार–त्याचा हेतू आणि परिणाम ?' असा आहे. या प्रश्नाचे उत्तर वर एके ठिकाणी आले आहे. केवळ आत्माविष्कार हाच या पर्णाचा हेतू होता; आणि कदाचित ज्या व्यक्तींच्यामुळे ती लिहिली, त्यांचे हृदयपरिवर्तन ! परंतु 'हृदयविनोदन'च काय ते शक्य आहे; वाङ्मयाने 'हृदयपरिवर्तन' अशक्य आहे, हे या पर्णांतील काही पर्णांतच नमूद केलेले आढळेल !

पहिले पर्ण 'Lift not the painted veil' हे शुद्ध वेदान्तपर आहे हे खरे. परंतु या 'सुफी पर्णांतील प्रेमाचा अनुभव हा तत्त्ववेत्त्याच्या किंवा more correctly तत्त्वशोधकाच्या प्रेमांचा अनुभव आहे. जीवनातील सुख, दुःख, (ईश्वरी दैवी) लीला हेही या प्रेमिकांच्या चिंतनाचे विषय आहेत. 'अभिमानी अहम्' हाही विषय आहे. 'Lift not the painted veil' ही शेलीच्या एका कवितेची पहिली ओळ आहे. पडदा उचलल्यास जीवनरूप ट्रॅजेडी उघड होईल, म्हणून शेली भितो, तर सुफी पर्णांचा कवि जीवनरूप कॉमेडी (किंवा खेळ) विघडेल म्हणतो. नंवर दोन मध्ये (The master shall never happy be) 'the sorrow of an idealist' 'uncompromisiny idealist' हा विषय आहे. सुफी पर्णांतील प्रेमिक, तत्त्वज्ञानपंडित या अर्थाने फिलॉसॉफर नाही, तत्त्वशोधक, अनुभवपिपासू असा आहे. तसाच तो हट्टी ध्येयवादीही आहे. अशा ध्येयवादाची दुःखे या (master shall never) सुफी पर्णात गायिली आहेत. त्यांच्या पुढील (नं. ३ Once again) हे पर्ण तर Tragic heroic mood नेच भरलेले आहे. अर्थात Tragedy misery हेही विषय या सुफीपर्णात येतात. शेलीने तर misery ला उद्देशून 'we two are sister and brother अशा अर्थाचे उद्‌गार काढलेले आहेत. फ्रॉईडभक्त यालाच morbid misery mongering मेसोचिझम् इ. इ. नावे देतात ! देवोत भले ! आमचे अनुभव आम्हाला प्रिय आणि फलप्रद असल्याने 'पेंग्विन'मधून फ्रॉइड वाचणारांना विचारायला जाण्याचे कारण नाही !

आता शेवटचा प्रश्न ! होय, गझलांचा परिणाम माझ्या लेखनावरच काय, पण माझ्या General make-up वरच आहे; माझ्या काव्य कल्पनेवरच, माझ्या 'प्रेमपद्धतीवरच (if this word could be pardened !!) आहे ! माझे गझलांचे व उर्दू काव्याचे वाचन, श्रवण १९२९ नंतर अधिक झाले असले, तरी गझलचे सूर व शब्द १९२१–२२ पासून मला वेडा करीत असत. शोपेनहौर नीत्शेच्या आधी, शेलेच्याही आधी, रवीन्द्र गद्याच्याही आधी, गझलच्या सुरांनी माझ्या Emotional Rhythm वर परिणाम केलेला होता. अर्थात सुफी पर्णांची

गझलशी तुलना होणार नाही. The latter is purer and more authentic Poetry. माझ्या सुफी पर्णांत Intellectual elements खूपच आहे. ती बुद्धीतून स्फुरलेली मात्र नाहीत. स्फुरली आहेत ज्वलंत भावनेतूनच.

तुमची First impression तयार झाल्यानंतर माझे हे आत्मकथन आपणांकडे जात आहे हेच अधिक बरे आहे. माझे कथन ऐकल्यावर तुम्ही तुमचे 'प्रथम संस्कार' लेखांत मांडू शकता. त्याचा उपयोग एखादे वेळी प्रास्ताविकात खुलासा करण्याला होईल.

माझ्या सुफी पर्णांत व्यक्त झालेले प्रेम टागोरांच्या काव्यातील प्रेमापेक्षा अधिक कसदार व जिवंत वाटले' हे तुमचे मत स्वीकारण्यात, फार तर टागोरांसंबंधीच्या अगोदरच आला तर आड येईल. एरव्ही ते मला बरोबर वाटते. तत्कालीन मराठीतील प्रेम–भावनेपेक्षा ते 'अधिक ध्येयनिष्ठ, उन्नत आणि वास्तवस्पर्शी जाणवले' हे आपले मतही एकंदरीत by and large बरोबर आहे. माधवरावांच्या प्रेमात ध्येयात्मक पूजन अधिक रमणीय आहे. पण माझ्या प्रेमकल्पनेत तात्त्विक बैठक अधिक पक्की आणि स्वयंस्फूर्त आहे; तसेच ते वास्तवावरही तितकेच आधारलेले आहे. अर्थात त्याचे सर्वांगपरिपूर्ण काव्य बनविण्यात इतर लोक–मराठी कवी–माझ्यापेक्षा अधिक दक्ष आणि यशस्वी आहेत. माधवराव म्हणत– 'यातील एक एक पर्ण म्हणजे एक एक gem आहे; पण त्याला काव्यविस्ताराचे कोंदण दिले पाहिजे. एकेका पर्णाची एकेक कविता तयार करता येईल.

अर्थात माझ्या प्रेमकल्पनेचा व प्रेमचित्रणाचा संबंध माझ्या जीवनमूल्याशी आहे व हेच त्या पर्णांतील 'तो' त्या पर्णांतील 'ति'ला पटवीत आहे! पर्णांतील intellectual element चे मूळ या 'पटविण्या'च्या धडपडीत आहे. पण ते पटविणेही प्रिय व्यक्तीलाच, व प्रेमद्वाराच असल्याने intellectual element मध्येही argument मध्येही प्रेमांतील आर्तता राहिली आहे असे वाटते.

आपला

**श्रीकेक्षी**

ता. क.

Typed प्रतींमध्ये काही जागी चुका राहिल्या आहेत: अर्थ कळण्यात व्यत्यय करतील अशाही चुका आहेत. ( उदा. mould च्या जागी mound पृ. ४. wide world च्या ऐवजी wild world पृ. ११; As Thorny च्या जागी As Throny पृ. २०; external standards च्या ऐवजी stards पृ. ४५ इ. इ.) तथापि ज्या अर्थी तुमच्या संकलित आकलनाला अडचण पडली नाही, त्या अर्थी विस्तार करीत नाही.

या निमित्ताने अधिक प्रती करून घेणे होईल व तुमच्या आस्थेवाईक

प्रतिक्रिया कळतील यादृष्टीने सुट्टीत हे काम केले. अमुक तारखेला त्यावर लेख येणे किंवहुना त्यावर लेख येणे हाही मुख्य हेतू नव्हे. ते केव्हा तरी होईलच. तुमचा खर्डा लिहून झाल्यावर आपली दोघांची गाठ पडल्यास कदाचित अधिक उपयुक्त चर्चा होईल !

तळवलकर आणि भय्या उमराणी यांचीही गाठ घ्यावी.

आपला
श्रीकेक्षी

# अन्य काही पत्रे

श्री

आत्माराम रावजी देशपांडे 'अनिल'
दूरध्वनी २४४२७

८८, पश्चिम उद्यान मार्ग,
धनतोळी, नागपूर – ४४००१२
शनिवार दिनांक १०।४।८२

प्रिय प्रा. अविनाश वि. कांवळे (सांगोलकर) ह्यांना सप्रेम नमस्कार, विनंती विशेष

आपले दिनांक २९ मार्च ८२ चे अंतर्देशीय पत्र मिळाले. आपण त्वरित उत्तर मागविले पण अशी पत्रलेखन त्वरा सध्या माझ्यात उरली नाही. हाताने काही लिहिणे अवघड जाते. क्षमा असावी. आपण स्वतःच्या मराठी अभ्यासाची, काव्यलेखनाची माहिती दिली; तिजमुळे आपली ओळख झाली. असो. ती वाढावी ही इच्छा. आपण एम्. फिल्. साठी प्रा. डॉ. भालचंद्र फडके ह्यांच्या मार्गदर्शनाखाली 'मराठी गजल' ह्या विषयावर जे लिहीत आहात तो प्रबंध ( थिसिस ) नसावा, तर प्रदीर्घ शोधनिवंध ( डिझर्टेशन ) असावे असे वाटते. कारण पीएच्. डी. साठी जो सादर करतात त्याला प्रबंध म्हटले जाते, असे मला वाटते.

आपल्या पत्रात आपण 'दशपदी'चे अनेक वचन म्हणून 'दशपद्या' हा शब्द वापरला. आपण मराठीचे जाणकार आहात. तेव्हा 'दशपद्या' हे अनेक वचन ठीक असले, तरी योग्य व उचित नाही, हे आपणासही जाणवले असेलच. मराठीत असे वरेच शब्द आहेत की ज्यांचे रूप अनेक वचनात बदलत नाही. उदाहरणार्थ 'बैल' 'काव्यकृती' ह्याचे अनेक वचन 'काव्यकृत्या' असे केले तर वरे वाटेल काय ? मी 'दशपदी'मध्ये सर्वत्र 'दशपदी'चे अनेकवचन 'दशपदी'च ठेवले आहे आणि संदर्भाने ते सहज ध्यानात येऊ शकते. 'दशपदी'संवंधी गंभीरपणे विचार करणाऱ्यांनी 'दशपद्या' असा वेढव शब्द वापरू नये, असे मला वाटते.



अनुक्रमणिका






प्रा. निशिकांत ठकार ह्यांचे 'मराठी कविता : स्वरूप आणि विचार' हे पुस्तक अजून मला पहायला मिळाले नाही. पण त्यांचे 'दशपद्या' ह्या गजलाच होत, असे विधान असेल तर ते सखोल नाही, असे मला वाटते. त्यांनी 'दशपदी' संग्रहातील 'दशपदी दर्शन' ह्या प्रास्ताविकाचा बारकाईने विचार केला नसावा. आपणही आपल्या पत्रात म्हणता की, 'आपणही (म्हणजे—मी) थोडेफार दशपद्यांचे स्वरूप गझलशी मिळतं जुळतं आहे असं म्हटलं आहे' आपण 'दशपदी-दर्शन' पुन्हा वाचून पाहावं, शब्दाशब्दाकडे लक्ष देऊन. असं मी कुठे म्हटले नाही. पान २१ कृपया पाहा. पाल्हाळिकपणे लिहिणे मला जमत नाही. जे लिहितो ते सूत्र पद्धतीने शक्य तो मोजक्या व थोडया शब्दांत असते. अभ्यासकांनी त्याकडे सूक्ष्मपणे लक्ष द्यावे, ही माझी अपेक्षा आहे.

गझलाचा अभ्यास कसा करावा या विषयी आपण मला मार्गदर्शन करावे असे म्हटले आहे. पण कोणत्या गझलांचा ? उर्दू गझलांचा अभ्यास असेल तर ती फार मोठचा प्रयासाची गोष्ट आहे. मराठीत 'गझल' हे एक 'वृत्त' म्हणून पूर्वीपासून वापरले गेले आहे. काव्याचा 'रूपबंध' म्हणून क्वचित काही कवींनी वापरले, ते त्यांचे संग्रह अभ्यासून शोधावे लागेल. हा फार विस्ताराचा विषय आहे पत्रात लिहिणे जमणार नाही.

सोमवार दि. १२–४–८२

आज पुन्हा लिहायला घेण्याची सवड व इच्छा झाली.

आपण 'तरुण भारत' पुणेसाठी मराठी गजलांशी संबंधित लेख लिहिणार आहात. त्यासाठी आपणास माझी मुलाखत हवी आहे. पत्राद्वारे मुलाखत म्हणजे जरा अवघड काम आहे. आपण विचारलेल्या प्रश्नांची सविस्तर उत्तरे द्यायची तर मलाच एक दीर्घ निबंध लिहावा लागेल. थोडक्यात सूत्र रूपाने उत्तर देत आहे. प्रश्नांची प्रत आपल्याजवळ असेलच. म्हणून ते लिहीत नाही. प्रश्नांच्या क्रमांकाप्रमाणे उत्तर देत आहे.

**प्रश्न १ :** दशपदी आणि गझल मधला फरक काय आहे हे कळण्यास 'आधी 'दशपदी' काय आहे हे समजून घेतले पाहिजे. 'दशपदीदर्शन'मध्ये मी जे म्हटले आहे ते अभ्यासले पाहिजे. गजलमधली प्रत्येक 'द्विपदी' म्हणजे 'शेर' हा स्वयंपूर्ण असतो. त्याला पुढच्या 'शेरची' अपेक्षा असतेच असे नाही. दशपदीमध्ये कोणतीही द्विपदी स्वयंपूर्ण नाही. ती दहा चरणांचा सलग प्रवाह असते. सारेच गजल पांच शेर असलेले म्हणजे दहा ओळींचे असतात असेही नाही. कांही गजलात ४, ६, ७ इतके 'शेर'ही असतात म्हणजे ८, १२ किंवा १४ ओळीही असतात.

**प्रश्न २ :** हा प्रश्न कवितेच्या निर्मिती व्यापाराचे ज्ञान नसलेल्यांनी विचारावा तसा आहे. गझलात काही अडचणी आहेत. दशपदी लिहिणेच अगदी कठीण आहे. कोणत्याही कवितेचा रूपबंध (घाट) हा आशयाशी निगडीत असतो.

अडचणीमुळे त्याचा आश्रय घेतला जातो असे कुणाला वाटावे ही एक समीक्षेची जाण नसलेल्यांच्या मनातली दुर्दैवी घटना आहे.

**प्रश्न ३ :** दशपदी ही गजलाच्या 'फॉर्म'सारखीच आहे, असे ज्यांना वाटते त्यांना 'फॉर्म' म्हणजे काय, 'दशपदी' म्हणजे काय आणि 'गझल' म्हणजे काय ह्यांचे आकलन झाले नाही, असे मी समजतो. 'दशपदी'ला 'गजल'चा एक नवा प्रकार म्हणणे म्हणजे नुसते चुकीचेच नाही तर अर्थशून्य विधान आहे. अशी विधाने आजकालच्या मराठी समीक्षेत मात्र चालून जातात.

**प्रश्न ४ :** मी 'दशपदी' लिहिल्या. उर्दू गजलासारखे शेर लिहिले नाहीत. अमुक एका फॉर्ममधे लिहिण्यास-बाह्यात्कारी कारण काहीच नसते. 'फॉर्म' हा आशयाचा असतो आणि आशयाशी निगडीत असतो.

**प्रश्न ५ :** ह्याचे कारण गझलमधला प्रत्येक शेर स्वयंपूर्ण असल्यामुळे त्याला चटकन 'दाद' मिळते, हे असावे.

**प्रश्न ६ :** 'गजल' मराठीत उर्दूप्रमाणे रुजली नाही. उर्दूप्रमाणे मराठीमध्ये संकेत' रुजले नाहीत. 'गझल'मध्ये बाह्य रचनाप्रकारापेक्षा 'कविवृत्ती'ला अधिक महत्त्व आहे.

**प्रश्न ७ :** हे भवितव्य त्यातील काव्यावर अवलंबून आहे. काव्य उत्स्फूर्तपणे येत राहील तर भवितव्य बरे राहील; पण नुसते 'गजल' पाडण्याचा प्रकार सुरू झाला तर भवितव्य बरे राहील काय, ह्याची शंका वाटते.

कळावे, कृपालोभ असावा.

आपला
'अनिल'

श्री. ना. पेंडसे
१० तुकाराम निकेतन—माहीम,
मुंबई १६
फोन ४५ ६४ ९२
दि. ६।७।८२

सप्रेम नमस्कार,

काही महिन्यांपूर्वी 'मु. पो. देवाचे गोठणे' वाचले. 'अजून उजडायचं आहे' कालच वाचून पुरे केले. तुमच्या ह्या दोन्ही कादंबऱ्या वाचकाचा लचका तोडणाऱ्या आहेत. 'उपरा' आणि त्यानंतर आपले साहित्य वाचल्यानंतर दलित साहित्य प्रौढ झाल्याची खात्री पटली.

दलित साहित्याचा उदय ही गेल्या दशकातील मराठी साहित्यातील सर्वांत महत्त्वाची घटना. आरंभाचा स्फोट काव्यातून होणे अपरिहार्य होते. विकारांनी

कलावंतावर मात करणे तितकेच अटळ होते; कारण हजारो वर्षांची ही वेदना तितकीच अमानुष आहे. कोणाही सवर्णाला कितीही सहानुभूती वाटली तरी ह्या वेदनेच्या पातळीवर तो जाऊ शकणार नाही. ह्या वेदनेतून एखादे महाभारत निर्माण होऊ शकेल; पण त्याकरिता व्यासमुनी दलितच असावा लागेल.

लेखकामध्ये नेहमीच दोन व्यक्तिमत्त्वे असतात. माधव कोंडविलकर–एक व्यक्ती आणि एक कलावंत ह्यातील सामाजिक कोंडविलकर सवर्णांना शिव्यांची लाखोलीच वाहणार. त्याच्याजागी मी असलो तरी हेच करीन– केले नाही तर माझ्या प्रकृतीत काही तरी बिघाड असेल ! 'संस्कृती ही वंध्या, नष्ट होवो !' असे माझ्यासारख्याला वाटते; तुम्हाला काय वाटेल !

कलावंत कोंडविलकरला मात्र असे विकारांच्या आहारी जाता येत नाही. त्याला ह्या वेदनेकडे 'अमानुष' अलिप्ततेनेच पाहावे लागते, अनुभवांचे चिंतन करावे लागते; कारण त्याला शेवटी माणसाच्या मनाचा ठाव घ्यायचा असतो. तुमची दोन्ही पुस्तके वाचल्यानंतर मी चकित झालो तो तुमच्या ह्या 'अलिप्त' पणाने. त्याचमुळे वेहेरेगुरुजींना तुम्ही विसरत नाही. शांताआक्काला विसरत नाही आणि भिवालाही वगळत नाही. महार–चांभारातील भेद किती अमानुष असतात ते पाहायला तुमच्यातील कलावंत कचरत नाही. तुमच्या लेखनाला वस्ताऱ्याची धार आली आहे ती ह्या 'अलिप्त'पणामुळे.

'उपरा, मु. पो.–' ही पुस्तके मला अस्वस्थ करून गेली; पण त्याचवेळी एक पापशंका आली, 'हे दोन्ही लेखक जबरदस्त आहेत. त्यांची भाषेवर कमालीची हुकमत आहे; पण स्वतःचे चरित्र त्यांनी जिवंत केले; पुढे काय ?' त्याचे तुम्ही 'अजून' लिहून उत्तर दिले आहे. तुम्हांसारख्याच्या साहित्याने दलित साहित्याचे एक समर्थ पर्व सुरू होत आहे.

आपण दोघे कोकणचे असा एक विचार मनात आला; पण लगेच वाटलं– चांभाराला कसलं कोकण आणि काय. तो कोठचाही असो त्याचा प्रदेश चांभारवाडा.

तुम्हाला साहित्यात उदंड यश मिळणार आहे.

आपला,
**श्री. ना. पेंडसे**

---

**भाषाशास्त्र**

● **गीतार्णव १८ वा अध्याय** ( एक भाषिक अभ्यास ) मोहोळकर गो. मु. मुकुंदराज प्रकाशन, १३/१५ सानेगुरुजी नगर, उस्मानपुरा, १–१९८९, मूल्य १०० रु.

---



अनुक्रमणिका

दि. ९।३।८८
मुंबई

प्रिय श्री. रंगा मराठे,

सप्रेम नमस्कार.

तुमची 'वणवा' कादंबरा वाचून संपवली म्हणून हे पत्र. मूळ विषयाची थोडी फार कल्पना असल्याने (आणि अधिक जाणून घेण्याची उत्सुकता असल्याने) केवळ कादंबरी म्हणून तिच्याकडे पहाणे जमले असे म्हणता येणार नाही.

पण तुम्ही ती नक्कीच फार वाचनीय केली आहे. विषय तसा वेगळा किंवा नवा नसतानाही वाचकाला गुंतवून ठेवण्याला कौशल्य लागते ते तुम्ही दाखवले आहे.

विषयाच्या हाताळणीच्या हिशेबात एका लेखकाने दुसऱ्याला काही सांगणे बहिऱ्याने मुक्याला उपदेश करण्यासारखे आहे. त्यामुळे मी ते करीत नाही. इतकेच की माझे पूर्ण समाधान झाले नाही. अजून पुष्कळ हवे होते. पण तुम्ही पकडलेली दिशा बरोबर होती. जरा अधिक पुढे जायला हवे होते–किंवा खरे तर खोल. तुम्हाला जाणवलेला गुंता तुम्ही जरा कठोरपणे तपासायला हवा होता. Compassion जगताना असावी, आयुष्य तपासण्यासाठी बसले की कठोर व्हावे. (म्हणजे निर्भय किंवा दुष्ट नव्हे.) भेटू तेव्हा जास्त.

तुमचा
विजय तेंडुलकर

---

## कादंबरी

- **मेन नेव्हर नो** – अनु. निगुडकर मंगला, श्री विद्या प्रकाशन, २५०, शनिवार पेठ, पुणे ३०, १–१९८८, ५५ रु.
- **काफर** – ले. खान राजन – प्रीतमसिंग जुनेजा, ४५ ए, बुधवार पेठ, पुणे २, ७० रु.
- **विस्तवाशी खेळायचंय मला** – ले. वाविस्कर भाऊ-प्रीतमसिंग जुनेजा, ४५ ए बुधवार पेठ, पुणे २, ७० रु.
- **बंदिस्त** – देशमुख नवनीत, सुयोग प्रकाशन, लक्ष्मीनगर, वाई नं. ७ वर्धा १–१८८७, २५ रु.
- **प्रथम अध्याय** – मराठे प्रभाकर, नीहारा प्रकाशन, पुणे २, १–१९८९, ४० रु.

---



अनुक्रमणिका







# नाटक : १९८८

—सुरेशचंद्र पाध्ये

मराठी रंगभूमीवर १९८८ मध्ये काय घडलं याचा विचार करताना येथे प्रामुख्याने व्यावसायिक रंगभूमीचा आणि 'व्यावसायिक पातळी'वर आलेल्या प्रायोगिक चळवळीतील नाटकांचा विचार केला आहे. त्यातही पुन्हा पुण्यात जे प्रयोग झाले तेच माझ्या पाहण्यात आलेले असल्याने तीही स्वाभाविक मर्यादा पडली आहे. या वर्षातील सर्वोत्कृष्ट नाटक म्हणून ज्या महेश एलकुंचवार लिखित आणि प्रतिमा कुलकर्णी दिग्दर्शित 'रूपवेध'ने केलेला 'आत्मकथा' नाटकाचा प्रयोग गौरविला जातो आहे तो मला अद्याप पाहता आलेला नाही. त्यामुळे ही एक मोठी उणीव या लेखात अपरिहार्यपणे राहणार आहे. शिवाय लेखाचे स्वरूप फारसे आढावादर्शक न ठेवण्याचेही ठरविले आहे. कारण आकडे-वारी आणि नोंदीत मराठी रंगभूमी तोलली जाऊ नये अशी माझी भावना आहे. अर्थातच सादर झालेल्या सर्वच नाटकांचा उल्लेख येथे केला जाणार नाही.

आता एवढी प्रस्तावना केल्यानंतर १९८८ या वर्षात रंगभूमीवर आलेली लक्षणीय नाटके कोणती ते पाहिले पाहिजे. त्यामध्ये 'ही प्रीत राजहंसी' 'चारशे कोटी विसरभोळे' 'मूकनायक' 'शतखंड' 'पाहिजे जातीचे' 'एक डोह अनोळखी' 'जय जय रघुवीर समर्थ' 'पार्टनर' 'अनैतिक' 'रानभूल' 'झुलवा' 'शहाणेवाडा पुणे' 'मगरमिठी' 'महामेरू' 'जिथे गवतास भाले फुटतात' 'शीतयुद्ध सदानंद' आणि मुंबईच्या 'संवर्धन'ने आणलेली सत्यदेव दुबे दिग्दर्शित 'हरवलेले प्रतिबिंब', 'अंधारयात्रा 'अविनाश एक ध्यास' यांचा उल्लेख आवश्यक आहे.

'बालगंधर्व जन्मशताब्दीच्या शुभपर्वात सादर करीत आहोत' अशा घोष-णेत 'ही प्रीत राजहंसी' हे बालगंधर्वांना डोळ्यापुढे ठेवून लिहिलं गेलेलं नाटक. 'बालगंधर्वांचं चारित्र्यहनन करणारं नाटक,' इथपासून 'बालगंधर्वांसारख्या अभि-नेत्याच्या मनीच्या व्यथांचा वेध घेणारं चिंतनशील उत्कृष्ट नाटक' इथपर्यंत वेगवेगळी मतं त्यावर मांडली गेली. चंद्रकांत काळे यांनी बालगंधर्वांची जागा घेणारी 'रघुनाथरावांची भूमिका सरस केली म्हणूनच नव्हे तर सफाईदार प्रयोगा-मुळेही ते लक्षात राहातं, पण बालगंधर्वांच्या गळ्यावर, रूपावर, अभिनयावर आणि श्रीमंतीवर अवघ्या मराठी मनानं 'राजहंसी प्रीती'ची रेशीमलड उलगडता



अनुक्रमणिका

उलगडता अशोक जी. परांजप्यांनी ज्या गाठी मारल्या त्यांनी शालूचं पोतेरं करून टाकलं. सुंदर प्रयोगाच्या शर्करावगुंठनातून भावनाभंजनाचं कडूजार बीज पेरण्याचं स्वातंत्र्य परांजप्यांनाच लखलाभ असो.

बालगंधर्व जन्मशताब्दी वर्षाच्या निमित्तानं शासनाने देऊ केलेल्या अनुदानाचा फायदा घेऊन अनेकानेक संगीत नाटके मंचस्थ झाली, पण त्यात नवी संगीत नाटके अभावानेच होती. त्यात ललितकला प्रतिष्ठानने कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचे 'मूकनायक' सादर करून एक आगळे औचित्य साधलं. बालगंधर्वांनी हे नाटक केलं होतं. नंतर शिलेदारांनी केलं, पण नव्या पिढीला हे नाटकच माहीत नव्हतं. अत्यंत रंजक असं हे नाटक पेलण्याची ताकद असलेले अभिनेतेच नसल्यानं ते बासनात गुंडाळून पडून होतं. भालचंद्र पेंढारकरांनी ते रंगमंचावर आणलं खरं पण भूमिकांसाठी चुकीची पात्र निवड, रंगमंचावरील विसंगत पात्र विरचना आदींमुळे ते प्रभावी ठरू शकले नाही. प्रल्हाद हडफडकरांची नाटचगीतं एवढाच त्यात विरंगुळा.

'पाहिजे जातीचे' हे विजय तेंडुलकरलिखित नाटक कै. अरविंद देशपांडे यांच्या स्मृत्यर्थ पुन्हा रंगमंचावर आणलं गेलं. त्याचं दिग्दर्शन कै. अरविंद देशपांडे यांचं होतं, तसंच कायम ठेवलं गेलं. नाना पाटेकरला प्रकाशात आणणाऱ्या या नाटकाच्या आताच्या प्रयोगातही नाना पाटेकरने आवर्जून भूमिका केली. नाटकातला नानाचा आणि विहंग नायकाचा अभिनय पाहणे ही मोठी सुखद गोष्ट होती. त्यातही विहंग नायकाची सहजसुंदरता मोहून टाकणारी. सुषमा तेंडुलकरने केलेली भूमिका मात्र एकूणात तिच्या अभिनयाबाबत चिंता वाटावी अशी होती.

'चारशे कोटी विसरभोळे', 'शतखंड', 'कारान', 'वाटापळवाटा' ही नाटके थिएटर अॅकॅडमीच्या कार्यशाळेचा परिपाक होती. तर 'जय जय रघुवीर समर्थ'लाही मूलतः या कार्यशाळेचाच आधार होता. परंतु यातल्या कोणत्याही नाटकाच्या प्रयोगाने अपेक्षित उंची गाठली नाही.

'हरवलेले प्रतिबिंब' ( महेश एलकुंचवार ), 'अंधार यात्रा' ( गो. पु. देशपांडे ), 'अविनाश एक ध्यास' (शांता गोखले) ही सत्यदेव दुबे यांनी सादर केलेली नाटकं 'महाराष्ट्रीय कलोपासक'ने पुण्यात आणली. ती सादर करणाऱ्या 'संवर्धन'ला 'आविष्कार'चा भलाभक्कम पाठिंबा होता. त्यांना प्रायोगिकतेच्या आविष्काराची डूब देण्याचा वृथा प्रयत्न नजरेआड केला तर ती चांगली नाट्यनिर्मिती होती. सुनील प्रधान यांनी या तीन नाटकांत वठविलेल्या तीन प्रकारच्या भूमिका हे या प्रयोगाचं आगळं वैशिष्ट्य होतं. दुबे यांच्या मुशीतल्या प्रयोगांची सफाई आणि पठडी तेथे जाणवल्याखेरीज राहत नव्हती. त्यांच्या मर्यादा लक्षात घेऊनही ते प्रयोग पाहण्यासारखे होते हे सांगायला हवं.

'शहाणे वाडा, पुणे' हे नाटक 'पेडगावचे शहाणे' या गाजलेल्या चित्रपटा-

वर आधारित. चित्रपटासाठी ग. रा. कामत आणि ग. दि. माडगूळकर यांची कथा वापरलेली होती. तिचं नाट्यरूपांतर केलं शं. ना. नवरे यांनी. शरद तळवलकर यांचा कसदार अभिनय आणि दामू केंकरे यांचं नेमकं दिग्दर्शन यांनी हा प्रयोग प्रेक्षणीय केला 'शिरीष थिएटर्स' आणि 'अभिरुची' यांनी हे नाटक मंचावर करताना 'पेडगावचे शहाणे' यांचा फार मोठा अपेक्षाभंग होणार नाही याची चांगली काळजी घेतली होती.

पर्यावरणासारखा विषय नाटकासाठी निवडण्याचं धाडस विनूमित्र या संस्थेनं रा. शं. दातार लिखित 'महामेरू' हे नाटक सादर करून दाखवलं. प्रशांत सुभेदार आणि मोहन जोशी हे या वर्षात रंगभूमीला खऱ्या अर्थानं मिळालेले दोन नट या नाटकात एकत्रित काम करीत होते हे त्याचं आणखी एक वैशिष्ट्य.

श्री. श्याम मनोहर यांच्या कादंबरीवर आधारित असलेलं 'शीतयुद्ध सदानंद' हे स्वतःचं नाट्यरूपांतर थिएटर ॲकॅडमीसाठी अतुल पेठे यांनीच दिग्दर्शित केलेलं. या नाटकाचं ते दीर्घ एकांकी आहे एवढंच वैशिष्ट्य नाही, तर ते 'इंटिमेट थिएटर' साठी सादर होतं हेही आहे. अर्थात ही काही त्याच्या प्रयोगशीलतेची वैशिष्ट्यं नव्हेत अशा वैशिष्ट्यांचे प्रयोग यापूर्वीही झालेत; पण पुण्यातील प्रायोगिक नाट्याची चळवळ जिवंत असल्याची साक्ष पटवणारं नाटक म्हणून त्याच्याकडे निश्चित पाहावं लागेल.

राजन मोहाडीकरांचे 'प्रतापगड' आणि वसंत कानेटकरांचे 'आकाशमिठी' ही नाटकं एकाच विषयावरची पण 'आकाशमिठी' नंतर आलेले. दोन्हीचा बाज स्वतंत्र. भाषा वेगळी, पण गाभा एकच. अर्थात 'आकाशमिठी' हे १९८८ मधील नाटक नसल्याने त्याचा विचार वेगळ्या रीतीने करावा लागेल. कानेटकरांचे 'जिथे गवताला भाले फुटतात' हे नाटक आपलं ऐतिहासिक ऐश्वर्य घेऊन आलं. नाट्यसंपदाने ते चांगलं पेललं; पण मूळचा प्रयोग नंतर राहिला नाही. त्यात बदल केले गेले आणि ते प्रयोगाला तारक ठरले असा निर्मात्यांचा दावा आहे. कानेटकरांच्या मान्यतेनंच हे बदल झालेले असल्यानं नाटकाच्या पुस्तकाच्या दुसऱ्या आवृत्तीत कदाचित ते स्वीकृत केलेले पाहावयास मिळतील.

'अनैतिक' हे शिवराज गोर्ले यांचं नाटक गाजले ते नाट्यबाह्य कारणांसाठी मुळात लिखाणाचा बाज प्रयोगात दिग्दर्शक भालचंद्र पानसे यांनी पार बदलून टाकला. त्यातच ॲक्टिव्ह थिएटर्सनं 'ॲक्टिव्ह' मधलं अद्याक्षर इंग्रजीत 'ए' असे मोठं काढून 'हिट ॲण्ड हॉट' नाटकाच्या प्रेक्षकाला आमंत्रण दिलं आणि समीक्षकांवर जाहिरातींच्या माध्यमातून चिखलफेक केली. प्रत्यक्ष बोलताना गाडीच कर्ज फेडण्यासाठी हे आवश्यक होतं अशी भूमिका ते घेऊ लागले; पण ते काहीही असलं तरी या नाटकानं राहुल सोलापूरकर हा एक चांगला अभिनेता खल नायकाच्या रूपानं मराठी रंगभूमी आणि चित्रसृष्टीला बहाल केला.

'ॲक्टिव्ह 'ला ' अनैतिक ' प्रौढांसाठी असल्याचा आभास निर्माण करावासा वाटला तरी ' धंदेवाईक ' या नाटकाचं नाव ' हिट ॲण्ड हॉट ' नाटकाचा प्रेक्षक नको म्हणून निर्मात्यांनी (कमलाकर सारंग) बदललं आणि ' मला आपली म्हण ' असं केलं हे उल्लेखनीय आहे.

' पार्टनर ' हे व. पु. काळयांच्या कादंबरीचं नाटयरूप. त्याला त्यांनी नाटक न म्हणता मधुकर गोलामडे यांनी सुचविलेल्या कलाप्रकाराचं ' नाटयांवरी ' म्हटलं आहे. दिग्दर्शक दिलीप कोल्हटकर यांनी हे नाटयरूप वेधक रीतीने सादर केलं पण धड ना नाटक धड ना कादंबरी असंच त्याचं स्वरूप राहिलं. गोलामडे यांनी नाटकातली नाटय आणि कादंबरीतला अंवरी असा धेडगुजरी संधी करून नाटयांवरी असा शब्द बनविला. अशी भाषेची आणि अर्थाची मोडतोड कधीच मान्य केली जाता कामा नये; परंतु नाटय आहे अंवरी जिच्या ती नाटयांवरी असा बहुव्रीही समास साधणारा शब्द म्हणून हा शब्द मान्य करण्यास हरकत नसावी. तर रंगमंचावर सादर होणारी ही ' नाटयांवरी ' या शब्दानंतरची पहिली नाटयांवरी ठरली. ' पहिल्या अंकात डोळे मिटून ऐकलं तरी चालेल आणि दुसऱ्या अंकात बघण्यासारखंही बरंच काही दिसेल ' अशा रीतीने ती सादर झाली असली तरी गोलामडे यांच्यासारख्या लेखकांना हव्या असलेल्या एका लिखाणाच्या माध्यमाला त्याने चालना मिळावी.

दत्ता भगत यांच्या ' वाटा पळवाटा 'चाही उल्लेख आवश्यक आहे. दृश्यापेक्षा शब्दांवर भर देऊन विचारप्रवर्तक पण सोपे लिखाण करणारा लेखक म्हणून दत्ता भगत यांजकडे पाहावयास हवं. दलितांचे आत्मभान आणि जागृती यातून घडणारी सामाजिक स्थित्यंतरं आणि मानसिकतेचा वेध हे नाटक चांगले घेते.

सर्वाधिक नाटके १९८८ मध्ये रंगमंचावर आली असे लेखक म्हणून वसंत कानेटकरांकडे पाहावं लागेल. ' आम्हीच आहोत आमचे मायबाप ' हे त्यांचं ' मास्तर एके मास्तर 'चं फेरलेखन केलेलं नाटक, सूर्याची पिल्ले हे जुनंच नाटक, 'मला काही सांगायचंय' हे पुन्हा जुनंच नाटक आणि 'जिथे गवतास भाले फुटतात' हे नवं नाटक. त्यानंतर शिवराज गोर्ले यांचा क्रम लागतो. त्यांची खटयाळ काळजात घुसली (नवरा सांगा कुणाचेच नवे नाव), ' लाफा बोले ना ' व अनैतिक ही तीन नाटकं या वर्षात मंचस्थ झाली. महेश एलकुंचवार यांची ' आत्मकथा 'त ' हरवलेले प्रतिबिंब ' ही दोन नाटकं आली. तर प्र. ल. मयेकर यांची ' दीपस्तंभ ' व ' रान भूल ' ही नाटकं आली. ' दीपस्तंभ ' हा ' कोल्हटकरी ' धर्तीचा मेलो ऽ ड्रामा होता तर रानभूल हे मानवाच्या स्वभावातील पराकोटीच्या प्रवृत्तीचं चित्रण आहे.

ज्या नाटकांचा प्रभावशाली म्हणून उल्लेख करावा अशा तीन नाटकांपैकी रानभूल हे एक. याखेरीज ' झुलवा ' आणि ' एक डोह अनोळखी ' यांचा उल्लेख आवश्यक ठरेल.

मयेकरांच्या 'रानभूल' मधलं रान साधंसुधं नाही. ते विकारांच्या श्वापदांच जंगल आहे. ओम् नाटचगंधा निर्मित आणि अष्टगंधा प्रचारित 'रानभूल' हे नाटक म्हणजे मयेकरांच्या मुशीतलं एक खासं रसायन आहे. रहस्य, गूढता आणि गतिमानता ही त्रयी ते तंत्र म्हणून वापरतात पण त्यांचा मंत्र आहे नाटकातील व्यक्तींच्या स्वभावरेखाटनात. दिग्दर्शक अरुण नलावडे यांनी तो नेमका ओळखून दृश्य आणि परिणाम पातळीवरही प्रभावी होईल अशा रीतीनं नाटक सादर केलं आहे.

मांजर जसं हाती सापडलेल्या उंदराशी जीवघेणा खेळ खेळतं तसाच खेळ या नाटकातली पात्रं एका निरागस धनिककन्येशी खेळतात. आर्थिक गरज आणि पैशाची चटक या दोन स्वतंत्र बाबी आहेत. पण त्या दोन्ही माणसाचं क्रूर श्वापद करतात. क्रौर्य, व्यसनाधीनता, वासनेची वखवख यांनी निरागसतेवर केलेली चाल, त्यातून निरागसतेचं अपरिहार्यपणे होणारं असहाय्यतेतील रूपांतर, त्यातून येणारं नैराश्य आणि भय हे सारं इथं दृगोच्चर होतं आणि अशाही परिस्थितीत मानवता जिवंत राहते ती याच पशुतुल्य माणसाच्या नाण्याच्या दुसऱ्या बाजूमुळे या क्रौर्याच्या तळाशी दडून राहिलेल्या पण अनिवार्य उसळी घेणाऱ्या चांगुलपणामुळे.

काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर या षड्रिपूंचं साम्राज्य असलेल्या विकारांच्या जोडीला भय, सहनशीलता, अगतिकता हे दासासारखे उपस्थित आहेत. या साऱ्यांनी मिळून जो अंधःकार निर्माण केला आहे त्यातच छुपेपणाने सदभिरुची अगदी मूकसंघर्ष करीत राहते आणि शेवटी या सद्भिरुचीचाच विजय होतो. पण प्रकृतीच अशी असते की, सदभिरुचीचा विजय म्हणजे इतर प्रवृत्तींचा पराजय नव्हे. त्या प्रवृत्तींचा विजय आधीच झालेला असतो. सदभिरुचीने विजयी होऊन करावं काय ? तिला तिथे थांबवताच येत नाही. मग ती 'माणसां'च्या जगात जाऊ पाहते. पण तिथे तरी तिला 'माणसं' भेटणार आहेत का ? की तियेही पुन्हा नवी 'रानभूल'च असणार आहे हा प्रश्नच राहतो.

दिग्दर्शकाने शब्दशरण शेवट वदलून कृतिशरण केला आणि लेखकाचा शब्दही न वदलता त्याने केलेल्या शेवटाचा विपर्यास करून नाटकाची उंची खाली आणली. नाटकाच्या शेवटी रंगा (नायक) मिताला (नायिका) सांगतो, 'मला या नाटकाचा शेवट मेलोऽड्रामात करायचा नाहीय्.' असं सांगून तो तिला सोडून जाऊ लागतो. आता निरागस मिताला या विकारांच्या जंगलात तशीच सोडणं अनुचितः— म्हणून तीही म्हणते, 'रंगा थांब. मी तुझ्यावरोबर येते आहे. तू मला माझ्या वावांकडे सोड.' अत्यंत व्यवहार्य असा हा तोडगा होता. मेलोड्रामा करायचा नाही, वास्तवाची पातळी सोडायची नाही आणि नव्या वाटेवरची प्रश्नचिन्हंही कायम ठेवायची. पण नलावड्यांनी अखेरच्या क्षणी मिताला रंगाच्या छातीवर मान ठेवायला लावून दोघांनीही परस्परांना स्वीकारल्याचं सूचित केलं आणि लेखकाला

असलेला 'मेलोड्रामा' करून टाकला. शेवटच्या प्रवेशात नानासाहेब, राजन आणि प्रिया अचानक कोठे गायब होतात याचा कोणताही खुलासा न मिळू देण्याची दिग्दर्शकानं केलेली चूकही परिणाम खाली आणते. पण या दोन बाबा वगळल्या तर दिग्दर्शक म्हणून अरुण नलावड्यांनी त्यातल्या दयाळच्या भूमिकेइतकंच सरस काम वठवलं आहे. विनय आपटे, विवेक लागू, बाजीराव पोपळकर, सोनाली अधिकारी या साऱ्याच कलाकारांनी भावना जिवंत करणारा अभिनय केला.

प्रकाश मयेकरांनी फिरत्या रंगमंचाचा केलेला कल्पक वापर पुढे अनेकांना दिशा देणारा ठरेल. अंधार न करता पात्रांच्या हालचालींबरोबर आणि शब्दांत किंवा संवादांत खंड न पाडता केला जाणारा स्थलबदल निश्चित प्रशंसनीय असा. संगीत, नेपथ्य, प्रकाशयोजना या साऱ्या बाबींचा नाट्यात्म परिणाम वाढविण्यासाठी अत्यंत कुशलतेने वापर केलेला दिसतो. या साऱ्यांच्या साहाय्याने प्रयोग दृश्य पातळीवर जसे एक कथानक साकारतो तसेच नेणिवेच्या पातळीवरही बरंच खाद्य पुरवतो. समर्थ नाटकाचं हे एक महत्त्वाचं वैशिष्ट्य म्हणून या नाटकाचं मोल अधिक आहे.

'झुलवा' हे 'सन्मित्र'ने मंचस्थ केलेलं उत्तम बंडू तुपे यांच्या कादंबरीचं चेतन दातार यांनी केलेलं नाट्यरूप. 'छबिलदास'ला 'हाऊसफुल्ल'चा रौप्यमहोत्सव करू शकणारं हे अलीकडच्या काळातलं एकमेव नाटक. तरीही ज्याला 'प्रायोगिक म्हणावं असं फार काही यात नाही. अजून व्यावसायिक रंगमंचावर न स्थिरावलेलं पण प्रायोगिक रंगभूमीवर जुनाट झालेले असं याचं तंत्र आहे आणि व्यावसायिक रंगभूमीवर हे तंत्र न येण्याचं एकमेव कारण म्हणजे यातली अवाढव्य पात्रसंख्या. असं असूनही 'छबिलदास'ला ते हाऊसफुल्लचा रौप्यमहोत्सव करतं याचं कारण प्रायोगिक चळवळीत थांबलेला नावीन्याचा शोध हेच.

या नाटकाच्या प्रयोगाला अर्थातच व्यावसायिक सफाई आहे. दिग्दर्शक वामन केंद्रे यांनी व्यावसायिक तडजोड न करता ती आणली आहे हे आणखी विशेष.

चेतन दातार यांनी मूळ कादंबरीला दिलेलं नाट्यमय निश्चित मोहक आहे. अशा कादंबरीतून असं नाटक कोरून काढणं ही निश्चितच सोपी बाब नव्हती.

ही कथा आहे जोगतीची. जोगतिणींची आणि त्यांच्याबरोबरचे तृतीयपंथी यांचं जीवन, त्यांच्याकडे पाहण्याची समाजाची स्वार्थलोलुप दृष्टी, त्यांची उपेक्षा आणि निव्वळ भोगवस्तू म्हणून होणारी हेटाळणी; त्याचबरोबर त्यांच्या अंधश्रद्धा, त्यांचे संघर्ष, त्यांच्या उत्तरायुष्याची होणारी दारुण परवड या साऱ्या गोष्टींचं अस्सल ग्रामीण बाजातलं दर्शन 'झुलवा'मध्ये घडतं. यातील 'जगनी' हे पात्र महत्त्वाचं. नव्या पिढीत स्थैर्य आणि शिक्षणाची निर्माण झालेली आवड आणि ती जोपासण्यासाठी प्रसंगी घरातून पळून जायची तयारी असली तरीही समाज,



अनुक्रमणिका

विशेषतः जोगतिणींच्या मुलींना जोगतीणच बनायला भाग पाडतो. समाजाच्या आणि समाजातील बलिष्ठांच्या वासनेचे हे बळी हा खरं तर समाजावरचा कलंक. पण हा कलंक पुसून टाकण्याऐवजी गोंजारण्यातच समाजाला धन्यता वाटते. त्यामुळे जगतीला सामूहिक बलात्कार, व्यक्तिगत फसवणूक यांनाच तोंड द्यावं लागतं. त्यातूनच तिला जेव्हा मुलगी होते, तेव्हा तिच्या नशीबी हे दिवस येऊ नयेत म्हणून ती जोगतिणीच्या यल्लम्मा ( रेणुका ) देवीलाच ती जलसमाधी देऊन टाकते.

समाजजागृतीचा वसा घेऊन केलेलं हे नाटक पांढरपेशांना मनोरंजनात्मक वाटण्याचा संभव असला तरी त्यांच्यातूनच जोगतिणींचं पुनर्वसन करून त्यांना नवे चांगले जीवन द्यावं यासाठी कार्य करू इच्छिणाऱ्या कार्यकर्त्यांची मनोभूमी तयार होऊ शकते. सन्मित्रने मुद्दाम बेळगाव, हुबळीकडेही प्रयोग करण्याचं ठरवलं होतं ते एवढ्यासाठीच.

प्रचंड गतिमानता, नाट्यमय प्रसंगांची रेलचेल आणि शब्दांना संगीताची भलीभक्कम जोड यामुळे प्रयोग अंगावर येतो. तसा तो यावा हा दिग्दर्शकाचा हेतूही आहे. तो सफल होतो. या नाटकाने दोन चांगले कलाकार मराठी रंगभूमी आणि चित्रसृष्टी, दूरदर्शनला दिले ते म्हणजे सुकन्या कुलकर्णी व सयाजी शिंदे. अल्लड किशोर वयातली जगनी आणि रेणुकेला जलसमाधी देणारी रौद्र जगनी तसंच फसवली गेलेली, अवमानित असहाय्य जगनी ही सारी रूपं ती समर्थ अभिनयानं साकारते. सयाजी शिंदे 'परसू'ही तृतीयपंथी व्यक्तिरेखा कोणताही हिडीस-पणा न येऊ देता साकारतो. त्यासाठी आवाज, हालचाली यांचा सुरेख वापर तो सात्त्विक अभिनयाबरोबरच करतो. अजीत आचार्यची वेशभूषा आणि अशोक पांगमची रंगभूषा, अरुण चांदीवाले यांचं नृत्यदिग्दर्शन प्रयोगाच्या उठावाला मोलाची मदत करतात. पण एक साहित्य प्रकार म्हणूनही कादंबरीची नाट्यरूप केलेली ही संहिता जरूर अभ्यासावी अशी आहे.

या वर्षीच्या नाटकांत 'एक डोह अनोळखी'चा क्रम बराच वरचा लागेल असं माझं मत आहे. अलेक्सी अर्बुझोव्ह या रशियन लेखकाच्या मूळ कथेवरून 'ॲन ओल्ड वर्ल्ड कॉमेडी' हे इंग्रजी नाटक बेतलं गेलं आणि त्याचं मराठी रुपांतर श्रीमती मालती मराठे यांनी 'एक डोह अनोळखी'मध्ये केलं. 'आविष्कार'ने ते नीलकांती पाटेकर यांच्या दिग्दर्शनाखाली मंचस्थ केलं आहे.

सुलभा देशपांडे आणि विनायक पै या दोन कलाकारांनी या नाटकातून जे नाजूक, तरल भावविश्व दोन अंकांतून उभं केलं आहे, ते लेखिका, दिग्दर्शक आणि कलाकार या साऱ्यांच्याच भावमेळाचं सुंदर प्रतीक होतं.

माणसं नेहमी दोन पातळयांवर जगत असतात. दृश्यात्म आणि भावात्म दृश्यात्म पातळीवरचं बोलणं कित्येकदा त्याच्या शब्दार्थांच्या अगदी विरोधी अर्

अनुक्रमणिका

भाव प्रकट करीत असतं. अशा भावार्थांची उकल या नाटकात होताना दिसते.

नाटकातली पात्रं दोन. डॉक्टर देशमुख आणि नंदिनी. दोघंही वयोवृद्ध. डॉक्टर आणि पेशंट या नात्यानं परस्परांच्या जवळ आलेली आणि मग प्रसंगोपात एकमेकांत गुंतत गेलेली. नंदिनीने आपल्याला सोडून जाऊ नये असं डॉ. देशमुखांना वाटत आहे, पण ती निघाली आहे तर तिनं जाणंच कसं योग्य आहे हे तिला वारंवार, निरनिराळ्या रीतींनी पटवून देताहेत. तीही आपलं जाणंच कसं अटळ आणि आवश्यक आहे हे सांगते आहे. दोघांचीही कृती तिनं तेथून जावं यालाच पोषक आहे, पण भाव मात्र तिनं तिथंच राहावं, तिथून कधीच जाऊ नये हा. शेवटी या भावनेचाच विजय होतो आणि नंदिनी कायमची डॉक्टरांना साथ द्यायला त्यांच्या घरी राहते. तर अशी व्याजोक्ती आणि व्यंजना यांचा भरपूर वापर लेखिकेनं नाटकात केला आहे. सामासिक, अलंकारिक भाषा हे जसं या संहितेचं वैशिष्ट्य आहे तसंच काव्यमय वातावरण निर्मिती हे दिग्दर्शनाचं आणि नेमक्या भावना प्रेक्षकांपर्यंत पोहोचविणारा सात्त्विक अभिनय हे कलाकारांचं वैशिष्ट्य आहे. या तिन्ही घटकांची एकत्रित आलेली वैशिष्ट्यं ही कलाकृती साक्षात जिवंत करून जातात.

डॉक्टर आणि नंदिनी ही यातली पात्रं नाटकाला आवश्यक तो संघर्ष सतत धगधगता ठेवणारी. कोप आणि कृतक कोप यांचा गोफ विणत प्रवास करणं हे या संहितेचं वैशिष्ट्य.

डॉक्टर वैवाहिक जीवन आणि निष्ठा यांना पवित्र मानणारे, बरेचसे पुराणमतवादी तर नंदिनी मुक्त, वैवाहिक जीवनाकडे निष्ठा वगैरे दृष्टीनं पाहूच न शकणारी, किंबहुना आज आत्ता आणि इथे जे आहे तेवढंच खरं, असं मानणारी या दोघांच्या स्वभावातला विरोधाभास आणि साम्यस्थळं यांची वीण विणत कथानक पुढे सरकतं. आयुष्यातली सुखदुःखं आणि वर्तमान परिस्थिती यांचे गजरे गुंफीत लेखिका भावाशयाचं सूत्र पक्कं करीत आपला हेतू तडीला नेते.

मंगेश कुलकर्णी यांनी नाटकासाठी लिहिलेली गीतेही लेखिकेच्या प्रकृतीला पोषक आणि भावगर्भ आहेत.

या काव्यातले भाव सुलभा देशपांडे व विनायक पै यांनी जोपासले आहेत. अंतर्यामीच्या दुःखाचे डोह लपवून आनंदाच्या डोहांना सामोरी जाणारी नंदिनी आणि दुःखाच्या कातरकडा मुडपून कर्तव्याच्या धारदार रुक्षपणाला कवटाळत काळ व्यतीत करणारे डॉक्टर. या नाण्याच्या दोन बाजू. नाण्यांवरचे छाप, अक्षरं आणि आकृतींसह सारे बारकावे ही दोघं छान दाखवतात.

अर्थात एवढं असलं तरी नाटक मुळात रशियन लेखकानं लिहिलेलं, त्यावर इंग्रजी नाट्यरूपांतर करताना झालेले संस्कार हे मुळात त्या त्या देशांची वाण घेऊन येतात. त्यामुळे वातावरण पुरेसं एतद्देशीय होत नाही. त्याला थोडा संदर्भ

आणि वातावरणाचा पाश्चात्य वास उरतोच. पण असं असल तरी हळुवार भावनांची उलगडणारी लड हे प्रादेशिक, सांस्कृतिक भेद झाकून टाकते आणि एक रेशीमगर्भ अनुभव समोर उभा ठाकतो.

या साऱ्या पार्श्वभूमीवर मागे उरते ती फक्त अद्याप 'आत्मकथा' पाहावयास न मिळाल्याची रुखरुख.

(सुरेशचंद्र पाध्ये, ११, मानसी, पत्रकारनगर, पुणे १६)

---

## कथासंग्रह

- **शेफाली** – वापट मुकुंद-डॉ. करंजगांवकर, 'नीलकंठ' एल. जे. रोड, माहिम, मुंबई, १–१९८८, किं. ३० रु.
- **अशांतसागर** – सोनुने जालंदर – सुयोग प्रकाशन, लक्ष्मीनगर, वार्ड क्र. ७, वर्धा, १–१९८८, किं. २० रु.
- **आभाळवेडी** – तिडके श्रीकांत, सुयोग प्रकाशन, वर्धा, १९८७ मू. १६ रु,
- **काळा डाग** – देशमुख नवनीत, सुयोग प्रकाशन, लक्ष्मीनगर, वार्ड नं. ७ वर्धा, १–१९८९, ४५ रु.
- **शेवांट** – नेरूरकर प्र. श्री., चिंतामणि साहित्य सहयोग, साहित्य सहवास मुं. ५१, १–१९८८, ४५ रु.
- **वेट नावाचं माणूस** – नेरुरकर प. श्री. पलश प्रकाशन, मुंबई, १-१९८८ मू. ६० रु.
- **हुलकावणी** – मंत्री रमेश, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, १–१९८८ ४० रु.
- **खिडकी** – अवचट सुभाष, सुरेश एजन्सी, २०५ शुक्रवार पेठ, पुणे २. १–१९८९
- **अंकुर** – संपा. साहित्य विज्ञान प्रबोधन मंडळ, १–१९८९
- **कोण्या एका स्वप्नकाळी** – दामले आशा, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३० १–१९८८, ४५ रु.
- **बाई वाटली आणि मी** – वल्लाळ नरेंद्र, पॅरेमाऊंट प्रकाशन, ९८ लक्ष्मी रोड, पुणे ३०, ३० रु.
- **अंगठीची करामत** – शहा रतनलाल श्री., पॅरेमाऊंट प्रकाशन, ११ लक्ष्मी रोड, पुणे १० रु.

---

# भाषिक व्यवहारातील आलेख

( भाषा–शोधन )
लेखांक सहावा

–डॉ. द. न. गोखले

(१४)

## उपान्त्यपूर्व स्वर : तत्समतर शब्द

संस्कृतातून मराठीत जे शब्द जसेच्या तसे आले आहेत त्यांना तत्सम म्हणतात. हे १३ व्या भागात सांगितले आहे. बाकीच्या सर्व शब्दांना आपण तत्समेतर शब्द म्हटले आहे. आतापर्यंत तत्समेतर शब्दांतील अन्त्य नि उपान्त्य स्वरांचा विचार संपला आहे. आता त्या शब्दांतील उपान्त्यपूर्व स्वरांचा विचार राहिला आहे.

तत्समेतर शब्दातील उपान्त्यपूर्व स्वरासंबंधी कोणताही समावेशक नि सुटसुटीत नियम नव्या शुद्धलेखनात उपलब्ध नाही. जुन्या किंवा परंपरागत शुद्धलेखनात असे सांगितले जाई की तत्समेतर शब्दातील उपान्त्यपूर्व इ–उ न्हस्व असतो, पण प्रत्यक्ष लेखनात तो केव्हा न्हस्व तर केव्हा दीर्घ दिसे. तेव्हा तत्समेतर शब्दांतील या उपान्त्यपूर्व इ–ई, उ–ऊ कडे पुन्हा लक्ष दिले पाहिजे.

आपण प्रथमतः तत्समेतर शब्दांतील उपान्त्यपूर्व इ–ई, उ–ऊ यांची काही उदाहरणे बघू या.

(१) दुकान, किंमत, पिठले, उसाची, तुझ्याहून, हिच्याशी, लुबाडले, भिऊन, गरिबावर, जमिनीचा. ( सिद्ध शब्द इ, उ न्हस्व. )

(२) कुळकथा, तिरकमठा, भुलथापा, तिसमारखान, हिणकस, निमगोरा, फुलबाग, मुळव्याध, तिळगूळ. ( सामायिक शब्द इ, उ न्हस्व.)

(३) दाढीमिशा, भाजीपाला, साळीकोष्टी, चोळीबांगडी, पाटीलवाडी, कढीलिंब, कडूलिंब, नदीनाला, वीसपंचवीस. ( सामायिक शब्द ई, ऊ दीर्घ )

(४) बहिणीवहिणी, चुकतचुकत, उडतउडत, उलटासुलटा, उघडानागडा, जिकडेतिकडे, समजूनउमजून, उधारपाधार, आडवातिडवा, धुसफुसणे, दगडबिगड. ( अभ्यस्त शब्द इ–उ न्हस्व. )

(५) काडीबिडी, शेजारीपाजारी, सवतीसवती, पेरूबिरू, धूरबीर, कधीकधी लाडीगोडी, भिकारी-टाकारी, वाईटसाईट, ( अभ्यस्त शब्द ई–ऊ दीर्घ. )



अनुक्रमणिका

(६) डिकदाणी (डिकाची बाटली,) कॉफिवाज, पिऊन, गिळून, घुमून, पिटपिटे, खुरपे, निवडक, फुसकट, रुचकर, फुटका, चिडखोर, पिणारा, धुणावळ, उपशिक्षक, निर्धास्त, विनतक्रार, विनभाड्याचे. (प्रत्ययघटित किंवा उपसर्गघटित शब्द, इ, उ ऱ्हस्व)

(७) गाडीवान, भाजीपाला, डीकदाणी, मोजणीदार, कॉफीवाज, (प्रत्यय-घटित किंवा उपसर्गघटित शब्द, इ–ऊ दीर्घ.)

वरील उदाहरणांवरून असे दिसते की सिद्ध शब्द नि साधित शब्द यांसाठी उपान्त्यपूर्व इ–ई, उ–ऊ ऱ्या ऱ्हस्व दीर्घत्वाविषयी वेगवेगळे नियम हवेत.

**सिद्धशब्दांसाठी नियम असा : सिद्ध शब्दांतील उपान्त्यपूर्व इ–उ ऱ्हस्व असतात.** उदा. दुकान, लुवाडले (क्रमांक १ मधील शब्द)

**साधित शब्दांसाठी नियम असा :** शब्द सामासिक असो, अभ्यस्त असो की प्रत्ययउपसर्ग घटित असो, **तो साधित असेल तर त्याच्या अवयवांत जोपर्यंत वेगळेपणाची धुगधुगी आहे तोपर्यंत ते अवयव स्वतंत्र शब्द समजून त्यांच्यातील ऱ्हस्व दीर्घत्व ठरते, जर वेगळेपणाची धुगधुगी नसेल तर तो साधित शब्द एक समजून त्याच्यातील ऱ्हस्वदीर्घत्व ठरते.** उदा. 'दाढीमिशा' हा सामासिक साधित शब्द, दाढी+मिशा हे त्याचे अवयव. दाढी स्वतंत्र शब्द समजून त्यातील ढी दीर्घ. (+ क्र. १ मधील सर्व शब्द) 'काडीविडी' हा अभ्यस्त साधित शब्द. काडी+विडी हे त्याचे अवयव. काडी स्वतंत्र शब्द समजून त्यातील डी दीर्घ. (+ क्र. ५ मधील सर्व शब्द) 'गाडीवान' हा प्रत्ययघटित साधीत शब्द. गाडी+वान हे त्याचे अवयव. गाडी स्वतंत्र शब्द समजून त्यातील डी दीर्घ (+ क्र. ७ मधील सर्व शब्द.) उलट कुळकथा, धुसफुसणे, खुरपे हे अनुक्रमे सामासिक, अभ्यस्त किंवा उपसर्गघटित सामासिक शब्द. पण त्यांच्या अवयवांत वेगळेपणाची धुगधुगी नाही. म्हणून त्यातील उपान्त्यपूर्व इ–उ ऱ्हस्व. (+ क्र. २, ४, ६, मधील सर्व शब्द.)

१३ ऱ्या भागात विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय यांच्याविषयी जो नियम सांगितला तो निरपवाद असल्यामुळे उपान्त्यपूर्व इ–ई, उ–ऊ, यांना येथेही लागू पडतो. उदाहरणार्थ पेरू–पेरू करतो. ऊ उपान्त्यपूर्व असल्याने ऱ्हस्व व्हावयास हवा होता. पण वरती हे शब्दयोगी अव्यय त्याला लागल्याने तो दीर्घच आहे. तसेच नदीखाली, गुरूहून, भुपाळीमध्ये इ.

## (१५)

## तत्सम शब्द

तत्सम शब्दांतील अन्त्य ई ऊ मराठीत दीर्घ होतात. (गुरू, कवी, नीती,) हा नव्या शुद्धलेखनाचा नियम आपण पूर्वी १२ ऱ्या व १३ ऱ्या भागात बघितला आहे. मराठीतील सर्व रूढ शब्द स्वरान्त मानावे, हा नव्या शुद्धलेखनाचा नियमही

आपण तेथेच बघितला आहे. शिवाय, विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यये लागताना शब्दांतील अन्त्य ई, ऊ दीर्घ होतात, हा 'निरपवाद' नियमही तत्सम शब्दांना लागतो. ( उदा. गुरूला, कवीहून, ऋषीवर, नीतीपासून ).

हा नियम वजा जाता, तत्सम शब्दांतील इ–ई, उ–ऊ संस्कृतात जसे असतील तसे ऱ्हस्व किंवा दीर्घ मराठीतही लिहावे. उदाहरणार्थ गुण, सुख, तरुण, तीव्र, तीक्ष्ण, शून्य वगैरे.

वरील तत्सम शब्दांतील इ–ई, उ–ऊ, बदलत नाहीत, हा नियम सांगायला फार सोपा आहे. पण आचरायला फार कठीण आहे. तत्सम शब्द इतर मराठी शब्दांची उच्चारप्रक्रिया मानीत नाहीत. म्हणजेच ते शुद्धलेखनाचे स्वतंत्र नियम मानतात. त्यांच्या उच्चारणात नि लेखनात ते तत्सम आहेत, हे लक्षात बाळगावे लागते अर्थात व्युत्पत्तीचे ज्ञान असावे लागते. ते शब्द संस्कृतात कसे आहेत, ते माहीत असावे लागते. मराठीत त्याची संख्याही पुष्कळ आहे. त्यामुळे त्यांच्याकडे दुर्लक्ष करता येत नाही. १९०० साली 'मराठी भाषेची लेखनपद्धती' या ग्रंथात (पृ. ६२) म्हटले होते की ' मराठी भाषेत ऱ्हस्वदीर्घाची भानगड मुख्यत्वे शेकडो शुद्ध संस्कृत शब्द प्रचारात आले आहेत, त्यामुळे होय. नव्या शुद्धलेखनातही ते बरेचसे खरे आहे.

काही तत्सम शब्द तत्समेतर शब्दांच्या नियमात बसतात. तर काही बसत नाहीत. उदाहरणार्थ (१) रूप, वीर, दीन, व्यूह वगैरे शब्द तत्समेतर शब्दाच्या १ ल्या नियमात बसतात. तर (२) गुण, विप, सुख, तरुण वगैरे तत्सम शब्द त्या नियमांत बसत नाहीत. (३) अंतरिक्ष, तृप्त, अदृश्य, पवित्र वगैरे तत्सम शब्द तत्समेतर शब्दांच्या २ ऱ्या नियमात बसतात. तर (४) तीव्र, तीक्ष्ण, पूज्य, शून्य वगैरे तत्सम शब्द त्या नियमांत बसत नाहीत. (५) लिपी, बंधुता, युक्ती वगैरे तत्सम शब्द तत्समेतर शब्दांच्या ४ थ्या नियमात बसतात, तर (६) क्रीडा, ईर्ष्या, असूया वगैरे तत्सम शब्द त्या नियमात बसत नाहीत. ( तत्समेतर शब्दांचे हे नियम १३ व्या भागात पूर्वी दिले आहेत. )

सर्व तत्सम शब्दांतील स्वरांचे ऱ्हस्वदीर्घत्व ज्यात व्यवस्थित सांगितले जाते असा समावेशक, सुटसुटीत नियम प्रस्तुत लेखकाच्या आढळात नाही. तो तो शब्द बघूनच त्यातील ऱ्हस्वदीर्घत्व आत्मसात करावे लागते.

मात्र, तत्सम शब्दांचे काही प्रत्ययसाधित गट घेऊन त्या त्या गटांसंबंधी काही मार्गदर्शन शुद्धलेखनाच्या अभ्यासकांनी मिळवलेले आहे :

अ) **अनीय-प्रत्यय** – हा प्रत्यय लागलेल्या शब्दांत उपान्त्य ई दीर्घ असतो.– पूजनीय, माननीय, वर्णनीय, प्रेक्षणीय, रमणीय, आचरणीय, दर्शनीय, शोचनीय, स्पृहणीय, इत्यादी.

आ) **इक-प्रत्यय** – हा प्रत्यय लागलेल्या शब्दांत उपान्त्य इ ऱ्हस्व असतो.



अनुक्रमणिका

–वार्षिक, मासिक, लौकिक, ऐतिहासिक, तात्कालिक, धार्मिक, अस्तिक, नास्तिक, नाविक, सैनिक, मानसिक, सांसर्गिक, पौराणिक, वैदिक, आध्यात्मिक, धनिक, रसिक, क्षणिक, श्रमिक, सुवासिक, नागरिक, चमत्कारिक, क्रमिक, आकस्मिक, प्रासंगिक, व्यावहारिक इत्यादी.

( तत्समेतर शब्दांना '**ईक**' प्रत्यय लागू शकतो. उदाहरणार्थ, पाल्हाळीक, खर्चीक, ठरावीक, मोकळीक, सोशीक, पडीक, त्रासीक इत्यादी. अर्थात तत्सम 'इक' प्रत्यय लक्षात ठेवून काम भागत नाही. 'इक' तत्सम शब्दांना आणि 'ईक' तत्समेतर शब्दांना लागत असल्यामुळे शब्द तत्सम का तद्भव हे कळल्याशिवाय उपान्त्य इ–ऱ्हस्व की दीर्घ ते कळत नाही ! )

इ) **इत-प्रत्यय** – हा प्रत्यय लागलेल्या शब्दांत उपान्त्य इ ऱ्हस्व असतो.–पुष्पित, फलित, दुःखित, खंडित, मुद्रित, पुलकित, उत्कंठित, मूर्च्छित, प्रतिबिंबित, परिक्षित, अपेक्षित, आनंदित, इच्छित, उपेक्षित, कल्पित, गणित, गुपित, त्वरित, दलित, संपादित, मर्यादित, प्रचलित, सुशिक्षित, नियमित, व्यथित, विरहित, संभावित, इत्यादी.

(पण निर्णीत, पुनीत, संगृहीत,(संग्रहीत) विपरीत, प्रणीत, परिणीत इत्यादी शब्दांत इतर अनेक कारणांनी उपान्ती दीर्घ ई येतो. अर्थात इत–प्रत्ययान्त शब्दांत उपान्ती ऱ्हस्व इ असतो असा सरधोपट नियम लक्षात ठेवून भागत नाही. कोणते शब्द इत–प्रत्ययान्त आहेत नि कोणत्या शब्दांत अन्ती ईत आहे असा संदेह उरतोच.)

(तत्समेतर शब्दांना **ईत** प्रत्यय लागू शकतो. उदाहरणार्थ, लखलखीत, चमचमीत, बुडीत, भाकीत, भरीत, जळीत, टवटवीत, सराईत, पटाईत, इत्यादी. अर्थात इक–ईक–प्रत्ययाप्रमाणेच येथेही शब्द मुळात तत्सम आहे की तद्भव आहे, ते कळल्याशिवाय योग्य ऱ्हस्वदीर्घ वापरता येत नाही.)

ई) **इय-प्रत्यय** – हा प्रत्यय लागलेल्या शब्दांत उपान्त्य इ–ऱ्हस्व असतो. उदाहरणार्थ राष्ट्रिय, क्षत्रिय, श्रोत्रिय ('राष्ट्रिय' हा शब्द 'राष्ट्रीय' असाही लिहिला जातो.)

उ) **ईय-प्रत्यय** – हा प्रत्यय लागलेल्या शब्दांत उपान्त्य ई दीर्घ असतो. उदाहरणार्थ, तदीय, मदीय, भारतीय, महाराष्ट्रीय, स्थानीय, स्वर्गीय, शास्त्रीय, कुटुंबीय, कारागारीय, इत्यादी.

(इय आणि ईय असे दोन्ही प्रत्यय असल्यामुळे सहज ऱ्हस्वदीर्घत्व ठरवता येणार नाही. इक–ईक–प्रमाणे किंवा इत–ईत–प्रमाणे येथेही शब्द मुळात इय–प्रत्ययान्त आहे की ईय–प्रत्ययान्त आहे, हेच कळले पाहिजे.)

ऊ) **ईन-प्रत्यय** – हा प्रत्यय लागलेल्या शब्दांत उपान्त ई दीर्घ असतो. उदाहरणार्थ, कुलीन, शालीन, नवीन, प्राचीन, अर्वाचीन, मध्ययुगीन.



अनुक्रमणिका

उपान्त्यस्वरयुक्त नि लेखनदृष्टया महत्त्वाचे असे काही प्रत्ययच येथवर दिले आहेत. 'इष्णु' (वर्धिष्णू, जयिष्णू) वगैरे प्रत्यय दिलेले नाहीत.

प्रत्ययातील उपान्त्य इ–ई, उ–ऊ ऱ्हस्व की दीर्घ हे ठरलेले असल्याने तो प्रत्यय लागलेल्या शब्दाचे ऱ्हस्वदीर्घ–लेखन सोपे जाते, हे आपण पाहिले. पण जेव्हा एक प्रत्यय ऱ्हस्वोपान्त असतो नि तसाच दुसरा प्रत्यय दीर्घोपान्त असतो तेव्हा ऱ्हस्वदीर्घाबाबत संदेह राहतोच, हेही आपण पाहिले. सारांश, प्रत्ययघटित शब्दगटांनी ऱ्हस्वदीर्घत्व लक्षात ठेवण्यास काही मदत होते, हे निःसंशय. पण त्यामुळे संदेहाचे निःशेष निराकरण होऊ शकत नाही, हेही खरे.

सारांश, तत्सम शब्द नि तत्समेतर शब्द यांचे शुद्धलेखनाचे नियम बरेचसे वेगवेगळे आहेत. दोन–तीन अपवाद वगळता, तत्सम शब्द मुळाप्रमाणे उच्चारावे नि लिहावे लागतात. त्यांच्यातील ऱ्हस्वदीर्घत्व समावेशक, सुटसुटीत नियमात बसवलेले आढळत नाही. उलट ते स्वैर वाटते. तत्सम शब्दांची मराठीतील संख्याही मोठी आहे. त्यामुळे मराठीचे शुद्ध उच्चारण नि लेखन अवघड होते. या तत्सम शब्दांशी परिचय वाढवीत वाढवीत, भाषेतील त्यांचे वर्णन बघत बघत, आणि कोशाचा उपयोग करीत करीत, '**जागरूक अनुकरणानेच हे**' शब्द शिकावे लागतात.

४ था, ५ वा, नि ६ वा असे तीन लेखांक (क्रमांक ९ ते १५ असे ७ भाग) शुद्धलेखनावर आतापर्यंत खर्ची पडले. पण शुद्धलेखन हा या लेखमालेचा प्रत्यक्ष विषय नाही. प्रमाण मराठीतील ठळक ठळक संदेहस्थळे नि प्रमादस्थळे घेऊन त्यासंबंधी मार्गदर्शन हुडकावे, हा या लेखमालेचा प्रत्यक्ष विषय आहे. त्यातही आधुनिक मराठी आणि आधुनिक मराठीतील गद्य यावरच लक्ष केंद्रित केले आहे. आधुनिक गद्याचा एक अंश म्हणूनच मराठी साहित्य महामंडळाच्या शुद्धलेखनाला ह्या पुरवण्या नि स्पष्टीकरणे जोडली.

☐

---

## चरित्र

- **गुलाब वाटिका** – संपा. मोहोड बाबा, वंदन प्रका. माधान, जि. अमरावती, १–१९८९, २० रुपये
- **जवाहरलाल नेहरू** – सौ. कुलकर्णी शीला, नीहारा प्रका. पुणे २, १–१९८९, ७ रुपये
- **धर्मवीर छत्रपती संभाजी महाराज** – जाखेड अरुण, उमा प्रकाशन, ३६।११ निवारा अपार्टमेंट, पुणे ४, १–१९८९, १० रुपये
- **अण्णासाहेब लट्ठे** – फडके यशवंत दिनकर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३० १–१९८९, ७५ रुपये

---



अनुक्रमणिका

## रसास्वाद

**अेक कविता : अेक प्रतिक्रिया**

**— डॉ. निशिकांत मिरजकर**

---

### निरोप

हातावरी पुष्पहात
लाजे तळवा कोवळा
सांवळयाशा बोटांवर
गौंर उन्हाचा सोहळा
पांच बोटांत गुंतले
निरोपाचे पंचप्राण
दूर जाताना कशाला
स्पर्शसुखाचे उधाण
आतां अंजली जुळून
हात करिती वंदन
मनगटी रुतलेले
फक्त उसासे कंकण...

—पुरुषोत्तम पाटील

**निरोप**

'नाटचगीत' हा शब्दसुद्धा अगडबंब वाटावा, अशी ही एक इवलीशी कविता. पण निशिगंधाच्या सुवासासारखा एक हलकासा नाटचक्षण या कवितेने अलगद पकडला आहे. यातले नाटच इतके नाजूक आहे, की जरा पकड स्थिर करण्याचा प्रयत्न केला असता तर हाती नुसते चमकदार (पण निर्जीव) रंग ठेवून भावनाटचाचे फुलपाखरू तुटक्या पंखांनी उडून–निसटून गेले असते.

हा एक निरोपाचा क्षण आहे.

आता निरोपाच्या वेळी, निरोप घेणाऱ्या व्यक्तींच्या भावनांना उधाण येणे, त्यांचे कल्लोळ मनी दाटणे, मनाचा प्रक्षोभ होणे, हे सारे स्वाभाविकच आहे.

निरोप घेणाऱ्या व्यक्तींचे परस्परांवरील प्रेम जितक्या प्रमाणात उत्कट असेल तितक्या प्रमाणात हा भावप्रक्षोभ तीव्र होणार, हेही साहजिक आहे.



अनुक्रमणिका

अशा भावना उचंबळून आलेल्या व्यक्ती परस्परांना गुदमरून टाकणाऱ्या आलिंगनात बद्ध होतील आणि अविरत वाहणाऱ्या अश्रूंनी व अनावर होणाऱ्या हुंदक्यांनी आपल्या वियोगाच्या दुःखाला वाट करून देतील.

पण जर त्या व्यक्तींचे परस्परांवरील प्रेम जर अस्फुट, अव्यक्त, अनिकट पातळीवरच थबकलेले असेल तर ?

तर काय होईल, ते या कवितेने चित्रित केलेले आहे.

निरोप घेताना हातावर हात ठेवलेला आहे. त्या हाताचा स्पर्श फुलासारखा वाटतो आहे. 'पुष्पहात' हा पदबंध फार अर्थपूर्ण आहे. मुळात तो हातही फुलासारखा नाजुक आहे आणि तो हाती ठेवलेला आहे तोही फुलासारख्या नाजुकपणाने. असा हा स्पर्शाचा सोहळा हातांना क्वचितच अनुभवायला मिळाला असणार, किंवा कदाचित हा पहिलावहिला हस्तस्पर्शही असणार, याची खूण दुसऱ्या ओळीत मिळते. कारण हाती आलेला फुलासारखा कोवळा तळवा लाजलेला आहे. या लाजऱ्या हस्तमीलनाने सावळ्या बोटांवर गौर उन्हाचा सोहळा साजरा होत आहे. दृक्–भाव–गम्य अशी ही प्रतिमा फार हृद्य आहे. सावळ्या बोटांत गुंफलेली गोरी बोटे आणि या हस्तमीलनात उजळलेले ऊबदारपणाचे वैभव, पुन्हा त्यातली सगळी नवलाईची अपूर्वाई ह्या साऱ्याचा मिश्रसंवेद्य प्रत्यय ह्या प्रतिमेने उभा केला आहे.

पाच बोटांच्या का ऊबदार मीलनात इतकी उत्कटता आहे की जणू पंचप्राणच तेथे गुंतले आहेत. हे पंचप्राण तिथे सोडवल्याखेरीज निरोप पुरा होऊ शकतच नाही. कधी नव्हे ते लाभलेले हे हस्तस्पर्शाचे सुख असेच अधिकाधिक ओसंडत रहावे, हा क्षण जास्तीत जास्त दीर्घ व्हावा, नव्हे तो संपूच नये, असे मनाला न वाटले तरच नवल. स्पर्शसुख कसे भरतीच्या लाटेसारखे उधाणून आलेले आहे. पण एकीकडे ह्या अनुभवात स्वतःला झोकून देत असतानाच एकीकडे विवेकही जागृत झालेला आहे. ह्या क्षणिक स्पर्शसुखाच्या उधाणातली व्यर्थता मनाला व्यथित करीत जाणवून जाते. आता दूर जायचे आहे, दृष्टिसुखालाही कायमचे आचवायचे आहे, मग ह्या क्षणाच्या स्पर्शसुखाची तरी असोशी कशासाठी ? आणखी काही क्षणातच जे संपून जाणार आहे, त्याच्यामध्ये जीव तरी किती गुंतवायचा ?

विवेकाचा हा विक्षेप मध्ये आल्यावरोबर हस्तस्पर्शातली आर्त ओढ संपून जाते. संपवली जाते. चारचौघांसारखे, शिष्टाचारविरहित, अंजली जुळून वंदन केले जाते. एका क्षणभरासाठी खुल्या केलेल्या अंजलीतून ओसंडणारे स्पर्शसुखाचे दान संपून मिटलेल्या त्या अंजलीमध्ये आता व्यवहारी जगाच्या निरोपाचा रूढ संकेत असतो. जे अपरिहार्य त्याची स्वीकृती असते. पण ओढ घेणाऱ्या, तडफडणाऱ्या मनाचे काय ? विवेकाने किती दटावले तरी मनाचा आक्रोश कसा शांत होणार ? पण नातेच असे अस्फुट, अव्यक्त नि व्यावहारिक संकेतांनी जखडलेले, की मनाचा आक्रोशही मोकळेपणी व्यक्त होऊ शकत नाही. अश्रूंना मनाई

आहे. हुंदक्यांना बंधन आहे. आतल्या आत आक्रोश जिरवताना निसटलेला उसासा तेवढा कवितेच्या अंती व्यक्त होतो. हा उसासादेखील पुरुषोत्तम पाटील आपल्या नेहमीच्या तंत्रयुक्तीने व्यक्त करतात. मनगटी रुतलेले कंकण उसासताना दिसते. प्रत्यक्ष व्यक्ती नव्हे. शिवाय येथे केवळ प्रक्षेपित भावालेखापेक्षा आणखी काही विशेष जाणवते. कंकण हे बंधनाचे प्रतीक. त्यात इथे कंकण मनगटात रुतलेले. स्पर्शाचा सोहळा साजरा करायला आतुर असलेल्या हाताला व्यवहारी जगाच्या बंधनांची जाणीव करून देणारे. मनगटाला त्याचा काच जाणवत असलेला. आतून नकोसे वाटणारे, परंतु अपरिहार्यतेने अगतिक बनणारे हे बंधन. हलकाच उसासा टाकण्यापलीकडे काही करू शकत नाही

मनी उठलेला भावकल्लोळ अत्यंत संयमाने, फिक्या सौम्य रंगात, परंतु अतिशय नाटयमयतेने वर्णन करणारे हे पुरुषोत्तम पाटील यांचे नाटयगीत मनात रेंगाळत राहते.

कारण त्यातला अनुभव हा कोणाही सर्वसामान्य रसिकाच्या अनुभवपद्धतीशी जवळीक साधणारा असतो. सर्वसामान्यांच्या जीवनात उद्भवणारे नाटयाचे क्षण असेच आर्त परंतु सौम्य असतात. व्यक्तित्वाला हादरवून टाकणारे अथवा अनुभव-सृष्टीची उलथापालथ करून टाकणारे प्रक्षोभक आवेशपूर्ण नाटय आयुष्यात कधी-तरीच वाटयाला येते. परंतु एरवी सामोरे येणारे सौम्यार्त नाटयानुभवही काही कमी वेध लावणारे नसतात, असा सौम्य नाटयानुभव यथार्थपणे साकार करण्याला वेगळेच कौशल्य लागते.

'निरोप' या कवितेत ते कौशल्य आहे.

**(वेध : तळयातल्या कविता : या आगामी पुस्तकातून. प्रा. कैलास सार्वेकर हे त्याचे संपादन करीत आहेत.)**

☐

---

## समीक्षा

- **स्वगत स्वागत** – वेदांते मधुकर, सन्मित्र प्रकाशन, ६९० बी, रविवार, कोल्हापूर १२, १–१९८८, ६० रुपये
- **लोकनागर रंगभूमी** – डॉ. भवाळकर तारा, नीहारा प्रकाशन, ५३४, ५३४ बुधवार पुणे २, १–१९८९, ६० रुपये

---



अनुक्रमणिका

पुस्तक परिचय

# मनमाधवी : मा. गो. काटकर

दिवाकर श्री. दुनाखे

कविवर्य मा. गो. काटकर यांचा 'मनमाधवी' हा तिसरा काव्यसंग्रह रविराज प्रकाशन, पुणे यांनी नुकताच प्रसिद्ध केला. त्या संग्रहाला सोलापुरातलेच प्रा. त्र्यं. वि. सरदेशमुख या प्रख्यात समीक्षक–टीकाकाराची विवेचक पण समर्पक अशी प्रस्तावना लाभली आहे.

सौंदर्यपूजा आणि कवी यांना अलग करता येत नाही. या संग्रहातील कवितांत निसर्गसौंदर्याच्या पार्श्वभूमीवर जीवनाविष्काराला आणि चैतन्यभावनेला काटकरांनी उदात्त केले आहे. याचे प्रत्यंतर अनेक कविता वाचून येते. त्यादृष्टीने 'गाणे', 'हिरव्या मनात', 'निळे सावळे', 'ओल्या मेघातून', 'पळसपाने', 'मोहफूल', 'सांज' या आणि अशा कितीतरी कवितांकडे पहावे. या कविता वाचून माणूस आणि निसर्ग यांचे नाते किती उत्कट आणि अतूट आहे याची सुखद जाणीव होते. माणसाच्या सान्निध्यात, माणसाच्या मनात येथे निसर्ग सजीव झालेला दिसतो.

चांदण्यात न्हालेल्या रात्रीला संग हवा
हिरव्या मनि वस्तीला सुंदरसा विहग हवा

यातील 'चांदणीरात्र' आणि 'हिरवे मन' यांचे धागे एकमेकात घट्ट विणलेले दिसतात. अशा हिरव्या मनाचा रंग मग हिरवाच राहत नाही. निसर्गाच्या सान्निध्यात येताच तो कधी प्राजक्तासारखा 'केशरदेठी' होतो तर कधी 'घननीळ' होतो. कधी तो 'आरक्त' होतो. तर कधी 'चांदणगौर'ही होतो. 'मोरपंखी' रंगाचे पिसेही त्याला कधी कधी जडते. ते मन कधी रातराणीच्या मादक गंधाने चांदणे माखीत सुटते. कधी जागृत पक्ष्यांच्या कंठातील अस्फुट गाणी ऐकत बसते. कधी कधी ते मन चांदण्यांच्या वेलीचे, 'गर्भालस केळीचे', 'मोत्याच्या पाण्याने न्हाऊन निघालेल्या तृणपात्याचे' निरीक्षण करते. तर कधी तेच मन चाफेगौर लावण्याने निथळणाऱ्या शेवंतीचे निरीक्षण करता करता स्वतःच पिवळी शेवंती बनून जाते. माधवीचा एक अर्थ म्हणजे मोहफुलातून काढलेला मध–अन् मनमाधवी म्हणजे मनाच्या फुलातील मध' असे हा संग्रह वाचताना वाटते.

काटकरांनी त्यांच्या काव्याचे माध्यम म्हणून कधी वृत्तबद्ध तर कधी छंदबद्ध



अनुक्रमणिका






रचना स्वीकारली आहे. परंतु त्यांच्या काव्याचा पिसारा मुक्तछंदापेक्षा वृत्तबद्ध रचनेतच जास्त फुललेला दिसतो. त्यांच्या काव्यावर कुठला विशिष्ट शिक्का बसलेला नाही.

'गझल' या काव्यप्रकाराविषयी आज असेच जबरदस्त आकर्षण निर्माण झाले आहे. 'गझल' लोकप्रिय होण्याची प्रमुख कारणे म्हणजे गझल रचनेचा एकंदर घाट, आशय व्यक्त करण्याचा थाट आणि गेयतेची आकर्षक बैठक, ही मानतात. या कसोटीला उतरतील अशा काही गझला काटकरांनी लिहिल्या आहेत. त्यांची 'खेद नाही खंत नाही', 'डोळयात तू पाहू नको', 'प्रेमयात्री' 'मीच माझा राहिलो' या गझलांची पोत त्यासारखी वाटते. काफिला पुढे गेल्याची सुप्त खंत मनाला वाटत असतानाच ते म्हणतात—

खंत आता का जरी तो काफिला गेला पुढे
त्यात माझा मीच होतो, मीच माझा राहिलो

जीवनाच्या खेळात काटकरांना माघार मान्य नाही. त्यात त्यांची हार होवो, जीत होवो, वेदना होवोत वा आनंद होवो. त्यांना फक्त एकच माहीत आहे—

चालणे पुढती नि मागे पावलांची स्पष्ट चिन्हे
भूवरी राहो न राहो, खेद नाही खंत नाही

आशयाच्या दृष्टीने चांगल्या म्हणाव्या अशा कवितात त्यांची 'हात' ही एक उत्कृष्ट कविता आहे. आपण आपल्या हातांना ओळखले नसल्याची खंत व्यक्त करून ते म्हणतात—

नम्रतेने जोडलेले हात, मित्र जोडून देतात
उगारलेल्या हातांनी, मित्रसुद्धा शत्रू होतात

किंवा 'श्रमणाऱ्या हातांनीच जीवनाला वैभव चढते' या ओळीतील सनातन सत्य कुणाला पटणार नाही. 'म्हणती कुणी, जगावे असे कमळ पाण्यात जसे' असा सहज आशय व्यक्त करणारी काटकरांची ही काव्यरीत छान वाटते. त्यांच्या 'जाण', 'देणे', 'सांगायचे कुणाला ?', 'जत्रा', 'भरल्या संसारात', 'माणूस' 'असे जगावे' या कवितातील आशय आणि कवीचे विचार चिंतनीय आहेत. 'एव-ढेच' या कवितेतील खालील ओळी पहा—

काळीज मोठे करून, जोडलेली नाती किती
हाती रिकामे शिंपले, एकातही नाही मोती

जीवनातील हे दारूण सत्य निराश करणारे असले तरी ते निखळ सत्य आहे.

काटकरांच्या काव्यशैलीचे दुसरे वैशिष्टच म्हणजे वर्णनात अचूकपणा येण्या-साठी सहजपणे योजलेले शब्द. निर्जीव शब्दांना काव्यात सजीव करण्याची त्यांची हातोटी वाखाणण्यासारखी आहे. ते शब्द वेगळा रंग घेतात, आगळे रूप घेतात, आणि त्यातून वर्णनदृश्ये किमया होऊन चित्रपटातील दृश्यासारखी भासतात—



अनुक्रमणिका

हिरव्या पानांच्या मागे केशरी कर्दळ
नववधूसम उभी सलज्ज निश्चल

या ओळीतील ' नववधू ', ' केशरी कर्दळ ' हे ' शब्द ' न राहता ' दृश्य ' होतात किंवा–

' अवचित वेळुवनी फुटलेली
स्तब्ध हवेवर शीळ उमटते
झाडांच्या हलत्या पानांतुन
शुक्रचांदणी टकमक बघते

या ओळीतील ' शुक्रचांदणी ' आपल्याला वेळुवनात घेऊन जाते. तिचे लुकलुकणे मग आपल्याला तिचे ' टकमक ' बघणे वाटू लागते.

काटकरांचे निसर्ग आणि माणूस. निसर्ग आणि सौंदर्य, निसर्ग आणि शिवत्व निसर्ग आणि मांगल्य यांची संगती कवितेत साधण्याचे कसब वाखाणण्यासारखे आहे निसर्ग सौंदर्य आपल्या प्राणाला, उर्जेला, पोषक असते याची खूणगाठ त्यांनी पक्की ठेवली आहे याची प्रचीती त्यांच्या अनेक कवितांत येते.

आपल्या मनाची प्रतिबिंबे दाखविणारी आपल्या भाव-भावनांची कदर करणारी काटकरांची कविता वाचता वाचता आपलीच होऊन जाते. आपले जीवन मोठे कसे होईल, ते कसे उन्नत होईल ते कसे उदात्त बनेल याची खरी काळजी ही कविता सहजगत्या घेते. काटकरांच्या प्रसन्न चिरतरुण व्यक्तिमत्त्वाचे अनेक पैलू असलेली ' मनमाधवी ' आपल्याच सुप्त मनात वसणारी अनाम माधवी आहे, याचा सुखद प्रत्यय देणारी ही कविता आहे. मात्र आपण आपले तसे मन घेऊन तिला सन्मुख व्हायला पाहिजे.

अनेक प्रतिभावंतांनी त्यांच्या काव्याबद्दल गौरवोद्गार काढले आहेत. तरीही काटकरांच्या काव्याची थोडक्यात वैशिष्टये सांगणे सोपे नाही. त्या काव्यात उमटलेल्या त्यांच्या प्रसन्न, मनोरम आणि आल्हादक प्रवृत्तीची झुळूक त्यात दिसते ती सुखद आहे. त्यांची जीवनमूल्यांवरील अटळ निष्ठा, निसर्गावरील त्यांचे प्रेम, मानवी धारणेसाठी लागणाऱ्या सुसंस्कृत भावभावनांचा कल्लोळ हे सर्व कुणालाही मोह पाडील. साधी सुटसुटीत रचना, विविध विचार, विविध भावना व्यक्त करणारी काटकरांची कविता आपल्या जीवनाचे पारदर्शी स्वरूप दाखविते. कधी ती साजशृंगार करते. कधी वास्तव रूपात अवतरते. तिचे स्वतःचे असे शांत तेज आहे. कवी संजीवांना ती नाजूक, स्वच्छ, रंगदार, तजेलदार अशा पारिजातकाच्या फुलांसारखी वाटली. सरदेशमुखांना अभिजात निसर्गसौंदर्याचा आविष्कार घडविणारी, संयमाचा उद्गार व्यक्त करणारी, आपल्याच मनाची विविध रूपे दाखविणारी ' बहुरूपिणी ' वाटली. मला मात्र वाटते, काटकरांची कविता म्हणजे टापटिपीचे अलंकार लेवून नटलेली, चापून चोपून नऊवारी भरजरी साडी नेसलेली शालीन–कुलीन ' सुवासिनीच ' आहे. त्यांचे साहित्यातील वैशिष्टयपूर्ण स्थान टिकवेल अशी

प्रतिभेने टवटवीत फुललेली रसिली कविता मनमाधवी संग्रहात आहे आणि तिचे रसिक वाचक स्वागतच करतील असा विश्वास वाटतो.

मा. गो. काटकरांनी २५ डिसेंबर १९८८ रोजी अमृतमहोत्सवी वर्षात पदार्पण केले आहे. आजपर्यंतच्या जीवनात काटकर तृप्त आहेत. त्यांनी अनेक नवोदित कवींना प्रोत्साहन देऊन लिहायला उद्युक्त केले आहे. त्यांनी भारत सरकार आणि महाराष्ट्र सरकारची पारितोषिके मिळविली आहेत. त्यांचे बालवाङ्मय त्यांच्या काव्याइतकेच प्रभावी आहे. त्यांचे शिक्षणक्षेत्रातले कार्यही महनीय आहे. या वयातही त्यांचा उत्साह तरुणांना लाजवील असा आहे.

(मनमाधवी : मा. गो. काटकर, रविराज प्रकाशन, पृष्ठे ८८, पंधरा रुपये)

---

# *अंगणातले आभाळ : यशवंत पाठक*

—प्रभाकर दिघे

---

मनमाड कॉलेजचे डॉ. यशवंत पाठक यांनी एस. एस. सी. पासून डॉक्टरेट मिळविपर्यंतचे आपलं आत्मकथन 'अंगणातले आभाळ' नावाखाली लिहिले आहे. ते त्यांचे आत्मकथन अतिशय प्रांजळ, कुठलाही आडपडदा न ठेवता लिहिलेले आहे. इतर आत्मकथनात न आढळणाऱ्या बऱ्याच गोष्टी त्यात आढळतात. थोर मराठी साहित्यिकांनी लिहिलेली आत्मकथनं एकतर फसलेली आहेत नाहीत, त्यांची परवड निवालेली आहे आणि काही आत्मकथनं तर साफ खोटी आहेत. कुणी कबूल करो अथवा न करो काही स्त्रियांनी लिहिलेल्या त्यांच्या आत्मकथनात नुसता आक्रस्ताळेपणाच आहे. एकीने आपल्यावर झालेल्या बलात्काराची तर दुसरीनं आपल्या प्रसूतिवेदनांची नि पतीने केलेल्या अन्यायाची करुण कहाणी सांगितली आहे. तेव्हा ह्या सर्व आत्मकथनात यशवंत पाठकांचे आत्मकथन मला उठून दिसले. कारण एक भिक्षुकी करणारा तरुण अठरा विश्वे दारिद्र्यातून कसा एम. ए. पीएच. डी. झाला त्याची ही प्रामाणिक कहाणी आहे.

ह्या तरुणाने आपल्या वडिलांनी, हमालीचा एक रुपया वाचविण्यासाठी, तीस तीस किलो वजनाचे बाजरीचे पोते स्वतःच्या पाठीवर घरापर्यंत आणले-तेसुद्धा स्वतः कीर्तनकार असून ! आणि आई, दीड मापटं गहू मिळविण्यासाठी पांजरपोळात गरीबांना धान्य वाटतात म्हणून तिथल्या रांगेत सकाळचा चहासुद्धा न घेता जाऊन उभी राहिली आणि मग ती चक्कर येऊन तेथे कशी पडली तेही सांगितले

आहे. हे सारं प्रामाणिकपणे कथन केले आहे. कुठेच अतिशयोक्ती नाही—कुठेच खोटेपणा नाही !

आईने संकल्पासाठी रामकुंडावर जायला सांगितले कारण संकल्प सांगितल्यावर दक्षिणा मिळते म्हणून. तेव्हा आपण भटजीची भूमिका वठविण्यासाठी कसा मेकअप केला तेही पाठक सांगतात.

कॉलेजच्या परीक्षेत पास होऊन क्लास मिळावा म्हणून गावातल्या बहुतेक देवांना आपण कसे काय काय नवस केले तेही सांगायला पाठक विसरत नाहीत. आणि प्राध्यापक म्हणून नोकरी मिळाल्यावर पाठकांना केवढा आनंद झाला तेही पाठक सांगतात.

'शांतिपाठ करणारा नाना प्राध्यापक झाला. भिक्षुकी सांगणारा नाना लेक्चरर बनला. संकल्पासाठी उभा रहाणारा नाना कॉलेजात शिकवायला लागला. आठ आण्याच्या दक्षिणेसाठी गणपती अथर्वशीर्षाची एकवीस आवर्तने करणारा नाना आता कॉलेजच्या मोठ्या मुलांना शिकवायला लागला.'

खोटेपणा करणाऱ्या खरे सरांचे पितळ उघडे करायलाही पाठक विसरत नाहीत. कुणाचं कमी पडलेले मार्क्स वाढविण्यासाठी स्वतः पैसा कधी घेत नसत. पत्नीकरवी पैसा घेत.

आपण म्हणतो की ज्यांच्यावर सुसंस्कार झालेत अशी मुलं पुढे वाईट मार्गाला जात नसतात. पण प्रत्यक्ष सतत देवाचंच नाव तोंडात घोळविणाऱ्या कीर्तनकारांचीच मुलं कशी छंदीफंदी निघाली तेसुद्धा आत्मकथनात आहे. एकजण ठाण्याच्या कौपिनेश्वराच्या मंदिरात आला—कीर्तनाच्या निमित्ताने. पण एका विधवेचे पोट वाढवून बसला. दुसऱ्याच्या जावयाने बायकोला सोडले आणि तो नायकिणीचा नाच्या बनला. एकाचा मुलगा छबुताईच्या तमाशात ढोलकीवादक बनला. कुणाच्या मुलाने शेठजीच्याच मुलीला पळविले आणि स्वतःची चंपी करून घेतली.

पाठकांचे वडील त्र्यंबकशास्त्री हे धुळ्याच्या प्रताप मिलमधली चांगली नोकरी सोडून डॉ. दत्तोपंत पटवर्धन ह्या राष्ट्रीय कीर्तनकाराची दीक्षा घेऊन कीर्तनकार बनले होते. त्याची आईसुद्धा उत्तम कीर्तन करीत असे. त्र्यंबकशास्त्र्यांचे असे एक स्वप्न होते की आपला मुलगा नाना याने बी. ए. ऑनर्स होऊन कीर्तनकाराचाच पेशा पत्करावा आणि उत्तम कीर्तनकार म्हणून नाव मिळवावे.पण त्यांच्या आईचा याला साफ विरोध होता. कारण कीर्तनकारांच्या संसाराची कशी धूळधाण होते—संसाराचा वणवा कसा होतो हे स्वतः तिने अनुभविले होते. म्हणूनच आपल्या मुलाच्या नि सूनेच्या वाट्याला पुन्हा तोच वनवास येऊ नये असे तिला वाटत होते.

पाठकांची आई फार व्यवहारी होती. संभाषणचतुर होती. प्रत्युत्तर देण्यात अगदी पटाईत होती. आईच्या तोंडची ही वाक्यं पहा — 'कुठंही टाकताना विचार

करून पाय टाकावा ', ' उरोठयाला पुरोठा ', ' मी काय सोलणार तुम्हाला ? माल पक्की आहे ', ' कुणाच्या तो कुणाच्या रूपाने रामराया उभा रहातो ', ' अरे बाबा, त्या अन्नासाठी तर आहे सगळं ' ' आपलं काम जर मुंगींकडूनही करायचं असलं तर त्या क्षणाला तीही देव वाटते ', ' ब्राह्मण वेळेवर आला तर भिक्षा नाहीतर शिक्षा' ' कशाला एवढं उघडं पडायचं ?', ' तुळसीदासाने पत्नीला गुरू केले. याज्ञवल्क्याने मैत्रेयीला गुरु केले. ' पाठकांच्या वडिलांच्या तोंडी सुभाषितंच कशी होती पहा – ' ते काय दुपारी पानावर वाढायला येत नाहीत ', ' लेकहो ! जरा पंचमहाभूतांच्या सान्निध्यात जा ना ', ' चटक्याने माणूस पक्का होतो तितका मोठा होतो ' ' आपण नीट राहिलो की काळ आपल्या पाठीशी धावत येतो.'

त्यांच्या आईच्या श्रद्धा अगदी साधारण गृहिणीसारख्याच होत्या. ' जावई-माणसाकडे पैसे मागितले की, गाढवीचा जन्म येतो ', ' बाराव्याच्या जेवणाने माणसं आजारी पडतात ', ' शिध्याबरोबर नवे सूप, तळाशी काळी चिंधी कुणा-वरून तरी सूप ओवळून टाकलंय ', ' अमावास्येला कुणी काही ओवाळून टाकतो.'

असं हे आत्मकथन मला फार आवडलं. आणि आवडलं म्हणूनच हे चार शब्द !

( अंगणातले आभाळ : यशवंत पाठक, ग्रंथाली प्रकाशन, मुंबई, सत्तर रुपये)

---

# अपराजिता : म. रा. कुंभार

**रंजक कथाद्रव्य पण सामान्य कादंबरी**

**–प्रा. वसंत केशव पाटील**

---

रोचक आणि रंजनकारी पात्र-प्रसंगांच्या ठिसूळ पटावर प्रेमप्रणयाचा दैव-विलासी खेळ मांडणारी रोमँटिक साहित्य–परंपरा एका मोठया वाचकवर्गाला नेहमीच आकर्षित करत असते. श्री. म. रा. कुंभार यांची प्रस्तुत कादंबरी अशीच सुखात्म कथाद्रव्य ठासून भरलेली पण सामान्य कादवरी आहे.

मातापित्यांचे ईश्वरदत्त संरक्षक छत्र अकाली हरवल्यावर नियतीचे प्रहार अधिकाधिक निर्मम आणि दाहक होत जातात. हे जीवनातील कठोर सत्य आहे. ह्या फेऱ्यात एकदा अडकले की नको ते जीवघेणे जगणे व जपलेल्या बऱ्यावाईट मूल्यांची होळी करणारे तांडव अनपेक्षितपणे चहुदिशांनी घोंगावत येते. हा असा भाग्यशरण भोगवाटा ' अपराजिता 'ची नायिका गीताच्या नशिबी आला आहे. ती

एक परिस्थिती—दग्ध वहाद्दर पोर वलात्कार, कोवळ्या स्वप्नांची होरपळ आणि कष्टाच्या, रावणुकीच्या होमात पडणारी तारुण्याची आहुती ह्या गुंत्यात अडकूनही अखेरपर्यंत जीवाच्या आकांताने कपाळकर्माशी झुंजत राहाते. काय असेल ते असो, ती परिस्थितीच्या कठीण परीक्षेत यशस्वी होते, हे असे चिमणीच्या जीवाएवढे कथाद्रव्य तसे मुळातच शवल आणि नाटकी. परिणामी, कादंवरीचा डोलारा केवळ निष्पर्ण वृक्षासारखा वठलेला व कळाहीन वाटतो.

वाचनीयता आणि रंजकता ही साहित्याची अगदीच प्राथमिक मूल्ये होत. तीच तेवढी इथे ठळक झाली आहेत. घटितांतील मौलिक नाटच वा खदखदता जीवनसंघर्ष कुठेही जिवंत व मर्मस्पर्शी वाटत नाही. अर्थातिच त्यामुळे तो मनाला पटत—भिडतही नाही. गीतेच्या वेदना कारुण्याचे कागदीपण मनात कुठेच झंकारत नाही, हेच या कादंवरीचे अपयश आणि मर्यादा. एकूण पात्रे ही शाडूची वाटावीत, अशी छापील व एकसुरी. त्यांत प्राणतत्त्वाचा सर्वथा अभाव आहे. पात्रांच्या शवल-तेचे एक कारण असे की, कोणत्याही कथा—कादंवरीच्या एकूण रचनेमध्ये अगदी प्रारंभीच एक मानसशास्त्रीय, तर्कसंगत व पटणारा असा भूगोल नि इतिहास ठसठशीतपणे प्रस्थापित होणे नितांत आवश्यक असते. तसे न झाल्यास सर्व पात्रप्रसंग एकदम वेगडी वाटतात. इथेही नेमके हेच घडले आहे. तरीही मनोरंज-नाचा भरपूर चटपटीत तपशील असल्यामुळे सामान्य वाचक ह्या कादंवरीवर निश्चितच खूश होईल.

एकदा भाषेवर बऱ्यापैकी हुकूमत वसली की पुरेशा गांभीर्याने साहित्य-सृजनाकडे एक खडतर साधना म्हणून न पाहाता केवळ हौसेपोटी उत्साहाने केलेल्या लेखनाची तऱ्हा व प्रतही अशीच राहाते. ग्रामीण नागर असा अकलात्मक भाषासंकरही मग खटकत नाही. पण जाणकाराला हे सगळे नक्कीच कळते. इथेही ती गंमत झाली आहे. कादंवरीचे कथानक एका खेड्याच्या पार्श्वभूमीवर घडते, पण नायिका गीता व तिच्या जीवनातील वरेच प्रसंग हे नागर समाज—संस्कृतीला जवळचे वाटतात. ह्या दोपाच्या पोटात भाषाशैलीचा नटवेपणाही अंतर्भूत आहे. कित्येक संवाद अगदी कृतक व प्रयोजनरहित असल्याने प्रभावशून्य वाटतात. पात्रप्रसंग हे कुठल्या तरी मातीला घट्ट चिकटून अंकुरले आहेत, असा भासही होत नाही. देशकाल—वातावरणाचा एक नेटका आधार पात्रप्रसंगांच्या बुडाशी असावा लागतो, याचे भान ठेवल्याने हे असे घडले आहे. इत्यर्थ हा की प्रस्तुत कादंवरी आद्योपांत फिल्मी स्टाईलची आहे.

श्री. म. रा. कुंभार गेली किमान चाळीस वर्षे आपल्या आत्मलयीत लिहीत आहेत. ज्येष्ठ ग्रामीण साहित्यिक श्री. म. भा. भोसले आणि अभिजात जीवनस्पर्शी जाणीव जोपासणारे ललित लेखक श्रीनिवास विनायक कुलकर्णी ह्यांच्या प्रेरक सहवासात असूनही श्री. कुंभार यांनी एक निव्वळ रोमॅन्टिक विपय कादंवरीच्या

कोंदणात ठोकून द्यावा, याचे जितके वाईट वाटते, तितकेच ते एक कोडेही वाटते.

( अपराजिता : म. रा. कुंभार, प्रयत्न प्रकाशन, औदुंबर, पृष्ठसंख्या १४४, अडतीस रुपये )

---

# संत ज्ञानेश्वर जीवन और कार्य

---

**प्रा. मुरलीधर सायनेकर**

---

महाराष्ट्राच्या सांस्कृतिक, वाङ्मयीन व भावनिक जीवनात ज्ञानेश्वरांना अनन्यसाधारण स्थान आहे. गेल्या ७०० वर्षांत महाराष्ट्रावरील राजकीय सत्तेत असंख्य स्थित्यंतरे झाली. तथापि ज्ञानदेवांचे मराठी मनावर असणारे अधिराज्य मात्र अक्षुण्ण रूपात चालू राहीले. ज्ञानदेवांना समकालीन असणाऱ्या भक्तशिरोमणी नामदेवांपासून ते थेट आजच्या विद्यापीठीय विद्वानांपर्यंत कित्येक अभ्यासकांनी ज्ञानदेवांच्या अलौलिक व्यक्तिमत्त्वाचा व त्यांच्या बहुविध कर्तृत्वाचा वेध घेण्याचा प्रयत्न केलेला आहे. केवळ २१ वर्षांच्या अल्पावधीत आपली इहलोकीची यात्रा संपविणाऱ्या ज्ञानेश्वरांच्या ठायी संतत्व, तत्त्वदर्शित्व व कवित्व यांचा अत्यंत दुर्मिळ असा संगम झालेला होता. मराठी भाषेत ज्ञानेश्वर व त्यांचे वाङ्मय यांच्या संदर्भात विपुल व दर्जेदार ग्रंथरचना झालेली असली तरी महाराष्ट्राबाहेरील अन्य भाषिक जनतेला ज्ञानेश्वरांच्या समृद्ध व संपन्न व्यक्तित्वाचा परिचय करून देण्याचे कार्य मात्र आजपर्यंत फारशा उत्साहाने हाती घेतले गेलेले नाही.

या दृष्टीने विचार करता प्रा. डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर यांनी संपादित केलेल्या व दिल्ली येथील 'वाणी प्रकाशन' या संस्थेने नुकत्याच प्रसिद्ध केलेल्या 'संत ज्ञानेश्वर जीवन और कार्य' या २८८ पृष्ठांच्या ग्रंथाचा आवर्जून उल्लेख करायला हवा. १२५ रुपयांना उपलब्ध असणाऱ्या या हिंदी ग्रंथाच्या प्रकाशनास मुंबई विद्यापीठाने आर्थिक साहाय्य केलेले आहे. डॉ. बांदिवडेकर यांनी हिंदी व मराठी या दोनही भाषांतून लक्षणीय स्वरूपाचे समीक्षालेखन केलेले आहे. मुंबई विद्यापीठातील 'रविंद्रनाथ टागोर तौलनिक साहित्याभ्यास अध्यासनाचे' प्रमुख या नात्याने कार्य करीत असताना या ग्रंथाची कल्पना बांदिवडेकर यांना सुचली.

२० व्या शतकात युरोपिअन व अमेरिकन विद्यापीठांतून तौलनिक साहित्याभ्यासाला विशेष महत्त्व प्राप्त झालेले आहे. भारतीय विद्यापीठांतून मात्र या

ज्ञानशाखेने अद्याप तरी म्हणावे तितके मूळ धरलेले नाही. त्यातही तौलनिक साहित्याभ्यासाच्या नावाखाली आपल्याकडे जे संशोधन अथवा लेखन केले जाते ते प्रायः भारतीय मातीशी कोणताही नातेसंबंध दर्शवीत नाही. ज्ञानपीठ पुरस्कार अथवा साहित्य–अॅकॅडमी सारख्या संस्था यांच्या माध्यमातून प्रमुख भारतीय भाषांतील उत्तमोत्तम साहित्यकृतींचा परिचय करून घेणे जिज्ञासू वाचकांना काही प्रमाणात शक्य होत असले तरी एकूण अशा वाङ्मयीन आदान–प्रदानाला अद्याप भरपूर वाव आहे. उच्चभ्रू भारतीय साहित्यिकांना परदेशी भाषांतील अद्ययावत घडामोडींची माहिती असण्याची जितकी शक्यता असते त्या तुलनेने शेजारच्या प्रांतात वाङ्मयाच्या क्षेत्रात नेमके काय घडते आहे हे त्यांना ज्ञात असण्याची शक्यता फारच कमी असते. भारतातील साहित्यिक व साहित्याभ्यासक यांच्या दृष्टीने ही परिस्थिती स्पृहणीय नाहीं हे निश्चित आणि म्हणूनच हिंदीसारख्या बहुमान्य संपर्कभाषेतून विविध भारतीय भाषांतील श्रेष्ठ साहित्यिक व त्यांच्या अभिजात वाङ्मयकृतींचा परिचय करून देणे अत्यावश्यक ठरते.

ग्रंथाच्या पहिल्या भागात एकूण २२ लेखांचा समावेश असून या लेखांतून ज्ञानेश्वरांचे जीवनचरित्र, त्यांचे धार्मिक कार्य, त्यांचा चिद्‌विलासवाद व त्यांचे विविधांगी वाङ्मयीन कर्तृत्व इत्यादी विषयांची चर्चा आलेली आहे. या विभागातील काही लेख या ग्रंथासाठी मुद्दाम लिहिलेले असून अन्य लेख पूर्वप्रसिद्ध मराठी ग्रंथांतून भाषांतरित करून घेतलेले आहेत. डॉ. रा. शं. वाळिंबे, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, डॉ. वि. रा. करंदीकर, प्रा. वा. ल. कुलकर्णी, प्रा. गं. बा. सरदार, डॉ. प्र. न. जोशी, डॉ. व. दि. कुलकर्णी, प्रा. म. वा. धोंड व डॉ. हेमंत इनामदार यांच्यासारख्या मान्यवरांनी ज्ञानेश्वरांच्या व संत साहित्याच्या संदर्भात केलेले विवेचन मराठी वाचकांना परिचित असल्यामुळे येथे त्याचा परामर्श घेण्याची आवश्यकता नाही. प्रा. रा. द. रानडे, डॉ. शं. गो. तुळपुळे, डॉ. शं. दा पेंडसे. प्रा. न. र. फाटक व प्रा. शं. वा. दांडेकर या अधिकारी व्यक्तींची अनुपस्थिती मात्र तीव्रतेने खटकल्याखेरीज राहात नाही.

ज्ञानेश्वर व वारकरी पंथ यांच्यातील अनुबंध उलगडून दाखवताना प्रा. म. वा. धोंड यांनी ज्ञानेश्वर दर्शनातील अद्वैतवाद, चिद्‌विलासवाद, भक्तिमार्ग, समता व कर्मयोग या पाच प्राणभूत तत्त्वांची चर्चा केलेली आहे. प्रा. वा. ल. कुलकर्णी यांनी ज्ञानेश्वरांच्या ग्रंथरचनेतून सातत्याने प्रतीत होणाऱ्या त्यांच्या चित्तवृत्तीच्या प्रसन्नतेकडे लक्ष वेधलेले आहे. डॉ. वाळिंबे यांच्या मते ज्ञानेश्वरांचे मेटॅफोरिकल थिंकिंग' त्यांच्या काव्यरचनेच्या केंद्रस्थानी आहे. शंकराचार्यांचा केवलाद्वैतावाद व ज्ञानेश्वरांचा चिद्‌विलासवाद यांच्यात कोणताही आंतरिक विरोध नसून चिद्‌विलासवाद म्हणजे शांकर वेदांताचे अधिक प्रगत व उत्क्रांत रूप होय असा लक्ष्मणशास्त्री जोशी यांचा युक्तिवाद आहे. अमृतानुभवाला आधुनिक



अनुक्रमणिका

रूप देताना विंदा करंदीकरांनी लिहिलेल्या प्रस्तावनेचे हिंदी रूपांतरही देण्यात आले आहे. ज्ञानेश्वरांचे व्यक्तित्व, साहित्य व तत्त्वज्ञान यांतील रहस्य जाणून घेण्यासाठी त्यांच्या धर्मकल्पनेतील प्रवृत्ति परत समजावून घेतली पाहिजे असे प्रा. सरदारांचे मत आहे. ज्ञानेश्वरांच्या वाङ्मयाची महत्ता जाणण्यासाठी 'वाचे बरवे कवित्व। कवित्वी बरवे रसिकत्व। रसिकत्वी परतत्त्व। स्पर्शु जैसा।' ही ओवी किती मर्मस्पर्शी आहे याचे विवेचन डॉ. व. दि. कुलकर्णी यांनी केले आहे. डॉ. प्रभाकर माचवे यांनी ज्ञानेश्वर व कबीर यांची तुलना करताना आधुनिक काळातील अस्तित्ववादाचा दिलेला संदर्भ सूक्ष्म विचारांती स्वीकारता येईल असे वाटत नाही.

या ग्रंथाचा दुसरा खंड अवघा ९ लेखांचा व ४६ पानांचा आहे. ज्ञानेश्वरीच्या हिंदी अनुवादांची माहिती देणाऱ्या डॉ. ग. न. साठे व डॉ. मो. दि. पराडकर यांच्या लेखात तपशीलाचे काही किरकोळ फरक असले तरी एकूण माहितीत फारसा फरक नाही. डॉ. विनय मोहन शर्मा यांच्या लेखात आळंदी हे गाव पैठणजवळ असल्याचा उल्लेख गैरसमजातून झालेला असावा. तथापि संपादकांनी ही चूक दुरुस्त केलेली नाही गुजराथी, बंगाली, ओडिआ, कानडी व तेलगू या भाषांतील ज्ञानेश्वर विषयक वाङ्मयाची माहिती अनुक्रमे जयेंद्र त्रिवेदी, डॉ. भोलानाथ मिश्र, डॉ. खगेश्वर महापात्र, डॉ. श्रीनिवास हावनूर आणि नरसा रेड्डी यांनी करून दिलेली आहे. डॉ. सदानंद मोरे यांनी ज्ञानेश्वर वाङ्मयाच्या इंग्रजी अनुवादांची माहिती दिली आहे. तमिळ व मल्याळम् यांसारख्या अन्य भाषांतून ज्ञानेश्वरांचे साहित्य गेले आहे की नाही याची माहितीही यायला हवी होती. अखेरीस लेखकांचा अल्पपरिचय देणे, मुद्रणात अनेक ठिकाणी चुका असल्याने 'शुद्धिपत्र' जोडणेदेखील अत्यावश्यक होते. तरीही डॉ. बांदिवडेकर यांनी एक अत्यावश्यक व महत्त्वपूर्ण कार्य निष्ठेने पूर्ण केले आहे हे निर्विवाद.

**( संत ज्ञानेश्वर : जीवन और कार्य : डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर, वाणी प्रकाशन, दिल्ली. पृष्ठे २८८ एकशे पंचवीस रुपये )**



अनुक्रमणिका

# परिषद–वार्ता
## (११ फेब्रु. ते १० एप्रिल १९८९)

**कै. कुरुंदकर स्मृतिदिन :** कै. प्रा. नरहर कुरुंदकर यांच्या स्मृत्यर्थ ११ फेब्रुवारीला त्यांचे एक निकटवर्ती प्रा. भास्कर महामुनी (नांदेड) यांचे 'कुरुंदकर : जीवन आणि कर्तृत्व' या विषयावर व्याख्यान झाले.

**कै. वाळिंबे यांना श्रद्धांजली :** सुप्रसिद्ध समीक्षक, वक्ते आणि परिषदेचे माजी कार्याध्यक्ष यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी १३ फेब्रुवारीला डॉ. हेमंत विष्णू इनामदार यांच्या अध्यक्षतेखाली सभा भरली होती. या सभेत डॉ. मु. श्री. कानडे, डॉ. कल्याणी दिवेकर, डॉ. चंद्रशेखर वर्वे, डॉ. न. म. जोशी, डॉ. सुहास मेहेंदळे, प्रा. दि. ब. केरूर आणि डॉ. गं. ना. जोगळेकर यांची श्रद्धांजली वाहणारी भाषणे झाली व शेवटी शोकप्रस्ताव संमत करण्यात आला.

**कविवर्य कुसुमाग्रज पुरस्कार :** कॉंटिनेंटल प्रकाशनतर्फे परिषदेमार्फत दरवर्षी देण्यात येणारा रु. १२०० चा पुरस्कार दि. २७ फेब्रुवारीला प्रा. सौ. अश्विनी धोंगडे यांना त्यांच्या 'स्त्रीसूक्त' या कवितासंग्रहाबद्दल देण्यात आला. संग्रहाचे प्रकाशक श्रीविद्या प्रकाशनचे श्री. मधुकाका कुलकर्णी यांनाही रु. ९०० चा पुरस्कार देण्यात आला. प्रा. डॉ. आनंद यादव यांच्या हस्ते हे दोन्ही पुरस्कार प्रदान करण्यात आले. डॉ. अरविंद वामन कुलकर्णी आणि श्री. जयंत वष्ट यांनी परीक्षक म्हणून परिषदेला सहकार्य केले.

**कै. चापेकर स्मृतीदिन :** ५ मार्चला कै. ना. गो. चापेकर यांचे स्मृत्यर्थ श्री म. वि. सोवनी यांचे 'महाराष्ट्रातील दागदागिन्यांची वैशिष्ट्ये' या विषयावर माहितीपूर्ण व्याख्यान झाले. श्री. सोहनी यांनी याप्रसंगी परिषदेला एक तवक भेटीदाखल दिले.

**श्री. गायकवाड यांचा सत्कार :** साहित्य अकादमीचा पुरस्कार लाभलेले लेखक 'उचल्या'कार श्री. लक्ष्मण माने यांचा ७ मार्चला प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या अध्यक्षतेखाली सत्कार करण्यात आला. याप्रसंगी श्री. चंद्रकांत घोरपडे आणि डॉ. अंजली सोमण यांची समयोचित भाषणे झाली.

**महाराष्ट्रकवी यशवंत स्मृतिदिन :** महाराष्ट्रकवी यशवंत यांच्या स्मृत्यर्थ डॉ. अरविंद वा. कुलकर्णी यांचे सौ. संजीवनी मराठे यांच्या अध्यक्षतेखाली व्याख्यान



अनुक्रमणिका






झाले. याप्रसंगी ' राजघाट ' कवितासंग्रहाचे कवी श्री. अरुण शेवते यांना ५०० रु. चा कवी यशवंत पुरस्कार देण्यात आला. परीक्षक म्हणून डॉ. अरविंद वा. कुलकर्णी आणि जयंत वष्ट यांनी काम पाहिले.

**कै. मर्ढेकर स्मृतिदिन :** २० मार्चला कै. वा. सी. मर्ढेकर यांच्या स्मृत्यर्थ प्रा. निर्मला मोने यांचे ' मराठी कवितेतील एकाकीपण ' या विषयावर व्याख्यान झाले.

**कै. ग. वा. बेहेरे यांना श्रद्धांजली :** परिषदेचे माजी कार्याध्यक्ष ' सोबत ' कार कै. ग. वा. बेहेरे यांना ५ एप्रिलला परिषदेतर्फे प्रकटरीत्या श्रद्धांजली वाहण्यात आली. प्राचार्य बाळ गाडगीळ यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या या सभेत सर्वश्री श्रीपाद जोशी, वसंत काणे, प्रभाकर ऊर्ध्वरेषे, शंकर सारडा आणि गं. ना. जोगळेकर यांची भाषणे झाली व शेवटी श्रद्धांजली वाहणारा ठराव संमत करण्यात आला.

**ज्ञानकोशकार केतकर स्मृतिदिन :** ज्ञानकोशकार कै. डॉ. श्री. व्यं. केतकर यांच्या स्मृतिदिनी (१० एप्रिल) परिषदेतर्फे दरवर्षीप्रमाणे दोन कार्यक्रम झाले. सकाळी कमला नेहरू उद्यानात कै. केतकर यांच्या स्मारकास पुष्पांजली वाहण्यात आली. याप्रसंगी सर्वश्री राजेंद्र वनहट्टी, म. श्री. दीक्षित, गं. ना. जोगळेकर, राजा फडणीस, अ. म. जोशी इ. कार्यकर्ते उपस्थित होते. सायंकाळी परिषदेच्या सभागृहात श्रीमती प्रतिभा रानडे यांचे ' डॉ. केतकरांचे कौटुंबिक जीवन ' या विषयावर माहितीपूर्ण व्याख्यान झाले.

**म. सा. महामंडळ :** मराठी साहित्य महामंडळाचे कार्यालय एप्रिल १९८९ पासून परिषदेकडे व्यवस्थापनासाठी आले आहे. महामंडळाच्या मुंबईच्या ७-४-८९ च्या सभेत श्री. राजेंद्र वनहट्टी (अध्यक्ष), राजा फडणीस (कोषाध्यक्ष) आणि डॉ. गं. ना. जोगळेकर (कार्यवाह) या परिषदेच्या प्रतिनिधींची महामंडळाचे पदाधिकारी म्हणून निवड करण्यात आली.

**परिषदेचा वर्धापनदिन :** परिषदेचा ८४ वा वर्धापनदिन शनिवार दि. २७ मे १९८९ रोजी पुणे येथे शिक्षणशास्त्र संस्थेच्या सभागृहात महाराष्ट्राचे मुख्यमंत्री ना. शरद पवार यांच्या अध्यक्षतेखाली साजरा होत आहे. याप्रसंगी कवी वा. रा. कांत (उत्कृष्ट साहित्यसेवेबद्दल रु. ३००० चा पुरस्कार व मानचिन्ह), नाटककार श्री. विनायक देवरूखकर (साहित्य साहाय्य निधीमधून मासिक निवृत्तिवेतनासाठी निवड) आणि श्री. म. श्री. दीक्षित (साहित्य संस्थेत दीर्घकाळ निरपेक्षपणे सेवा करणारे कार्यकर्ते म्हणून कै. डॉ. भीमराव कुलकर्णी स्मृती–पुरस्कार) या तिघांचा मुख्यमंत्र्यांच्या हस्ते सत्कार होणार आहे. परिषदेतर्फे जी विविध ग्रंथपारितोषिके



अनुक्रमणिका

दिली जातात (यादी प्रस्तुत अंकात अन्यत्र पाहा) त्या ग्रंथांचे लेखक, संपादक, कवी यांनाही याचप्रसंगी पारितोषिके दिली जाणार आहेत.

**विभागीय संमेलन :** परिषदेचे ६ वे विभागीय साहित्य संमेलन येत्या ३ व ४ जून रोजी पिंपरी–चिंचवड शाखेतर्फे पिंपरी येथे भरण्याचे निश्चित झाले आहे. कविवर्य वसंत बापट यांच्या अध्यक्षतेखाली भरणाऱ्या या संमेलनात दोन परिसंवाद, कथाकथन, दोन कविसंमेलने इ. कार्यक्रम होणार असून त्यात नामवंताबरोबर नवोदित लेखक–कवीही सहभागी होणार आहेत.

(वरील दोन कार्यक्रमांचे वृत्त पुढील अंकी देण्यात येईल.)

**राजा फडणीस / गं. ना. जोगळेकर / चिं. शं. जोशी**
कार्यवाह

---

## महाराष्ट्र साहित्य पत्रिका

( तक्ता क्र. ४ नियम ८ प्रमाणे माहितीपत्रक )

| | | |
|---|---|---|
| प्रकार | | त्रैमासिक |
| स्वामित्व | | महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे ३० |
| संपादक | | श्री. शंकर सारडा<br>पत्ता : महाराष्ट्र साहित्य परिषद<br>टिळक रोड पुणे–३० |
| राष्ट्रीयत्व | : | भारतीय |
| प्रकाशक | | श्री. राजा फडणीस<br>पत्ता : महाराष्ट्र साहित्य परिषद<br>टिळक रोड, पुणे ३० |
| राष्ट्रीयत्व | | भारतीय |
| मुद्रक | | श्री. राजा फडणीस<br>पत्ता : महाराष्ट्र साहित्य परिषद<br>टिळक रोड, पुणे ३० |

मी राजा फडणीस असे जाहीर करतो की वर दिलेली माहिती बरोबर आहे.

**राजा फडणीस**
कार्यवाह महाराष्ट्र साहित्य परिषद

---

# साभार स्वीकार

## कादंबरी

१. तीन पानी डाव – राजगुरु विनायक, काँटिनेंटल प्रकाशन पुणे ३०, १–१९८८, २५ रु.

२. प्रेमाची परिपूर्ती – हळदणकर संदीप, मैथिली प्रकाशन १२०४।१३ घोले रोड, पुणे, १–१९८८, २५ रु.

३. युगंधर – हाटे वा. स. संबोधि प्रकाशन, १०/८० उन्नत नगर, म. गांधी रोड, गोरेगाव (प.) मुंबई ४०००६२, १–१९८८, ५० रु.

४. कर्वालो व गूढ माणसं – सौ कुलकर्णी उमा, मराठी साहित्य परिषद, आंध्रप्रदेश, इसामिया बाजार, हैद्राबाद, ५०००२७, १–१९८९, ४० रु.

५. अनोखी प्रीती – वझे सरोजिनी, पॅरेमाऊंट प्रकाशन, लक्ष्मी रोड पुणे १–१९८८, मूल्य २० रु.

६. सत्तेचा गुलाम – पाध्ये यशवंत, पॅरेमाऊंट प्रकाशन, ९९ लक्ष्मी रोड, पुणे १–१९८७, २५ रु.

७. प्रेम मुहब्बत झिंदाबाद – बोरगावकर शकुंतला, पॅरेमाऊंट प्रकाशन, ९७ लक्ष्मी रोड, पुणे, ३५ रु.

८. मदनिका – पाध्ये यशवंत, पॅरेमाऊंट प्रकाशन, १०८ लक्ष्मी रोड, पुणे १–१९८८, ३० रु.

## विज्ञान

१. आण्विक उन्हाळा – पाध्ये यशवंत, पॅरेमाऊंट प्रका. १०० लक्ष्मीरोड, पुणे ३०, १–१९८७, मूल्य ४० रु.

२. विज्ञान आणि अंधश्रद्धा – आर्डे प. रा. नीहारा प्रका. पुणे २, १–१९८९ ११८ रुपये

३. विज्ञान आणि मानव विज्ञान – दांडेकर कुमुदिनी श्री विद्या प्रका. पुणे ३०, १–१९८९, ६० रुपये

## वार्षिक

१. अबोली – सं. नाईक तुकाराम, द. रत्यागिरी साहित्य संघ, सावंतवाडी १९७८–८८, १५ रुपये



अनुक्रमणिका

## काव्य

१. सणंग – वैजी जयवंत, अक्षर चळवळ प्रकाशन, हनुमान चौक, मुलुंड, मुंबई ८१, १–१९८८, १० रु.

२. मंझधार – पोतदार अनुराधा, सुरेश एजन्सी २०५ शुक्रवार पेठ पुणे २, १–१९८९

३. तिन्हीसांज – खानोलकर व. शं. श्रीकल्प को. हौसिंग सोसा. एव्हरेस्ट हॉलचे मागे, डोंबिवली, मूल्य १५ रु. १–१९८८

४. अंग्लंडच्या कविता – चिंधडे शं. तु. नीलकंठ प्रकाशन, टिळक रोड, पुणे, १–१९८८, किं. ९ रु.

५. वावर – बडे भास्कर, वावर प्रकाशन, ३३ बी, न्यू शांतीनिकेतन कॉलनी औरंगाबाद, १–१९८८ किं. १० रु.

६. फूल फुलता राहीना – इनामदार श्री. दि. किर्ती प्रकाशन, औरंगाबाद, १–१९८८, मूल्य २० रु.

७. हळवा वारा – शकुंतला पाटील, विश्राम पाटील, 'विहंग' अ १२२ इंदिरानगर विजापूर रस्ता, सोलापूर ४ मार्च १९८९, किं. २० रु.

८. यात्री – सुधांशु, दिलीपराज प्रकाशन, ८५२ रविवार पेठ, पुणे १–१९८९, मूल्य ३२ रु.

९. सांजक्षितिज – वळसंगकर व्यंकटेश, मराठी साहित्य मंडळ, स्टेशन बाजार, गुलबर्गा २, १–१९८८, मूल्य १५ रु.

१०. ऋतुचित्र – शिरीष पै, पॉप्युलर प्रका. ३५ सी मालवीय रोड, ताडदेव, मुंबई ३४, १–१९८८, ५० रुपये

११. अक्षरदिवे – प्रा. बुलबुले रविकिरण, नीहारा प्रका. ५३४ बुधवार पुणे २ १–१९८९, ९६ रुपये

## संकीर्ण

१. विकासवेध – प्रा. श्री. चां. ता. बोरा महाविद्यालय शिरुर जि. पुणे, १–१९८८,

२. जगाची शेती – पाटील जयंतराव, म. रा. साहित्य आणि सं. मंडळ, मुंबई, १–१९८८, किं. ३० रु.

## कला

१. बेरक्या फिरक्या – दीपक देशमुख, सुयोग प्रका. वर्धा, १–१९८८, मूल्य ८ रु.

२. मुक्त संगीत संवाद – डॉ. संगोराम श्रीरंग, गानसंवर्धन संस्था, आशीर्वाद बंगला, मुकुंदनगर, पुणे ३७, १–१९८८, मू. १११ रु.

## इतिहास

१. महाराष्ट्राचा इतिहास – खोवरेकर वि. गो., म. रा, साहित्य व संस्कृती मंडळ, मुंबई ३२, १–१९८८, किं. १०० रु.

२. पाकिस्तानचे जन्मरहस्य – ले. नगरकर वसंत, अनु. लिमये माधव, म. रा. साहित्य आणि सं मंडळ, मुंबई, १–१९८८, किं. ३१ रु.

३. भारतीय मुसलमानांचा राजकीय इतिहास – अनु. पाध्ये कमल, म. रा. साहित्य आणि सं. मंडळ, मुंबई ३२, किं. २६ रु.

४. विसाव्या शतकातील महाराष्ट्र खंड १ ( १९०१ ते १९१४ ) फडके यशवंत दिनकर, प्रकाशन सासवड आश्रम विश्वस्त मंडळ, पुणे– १–१९८९, ९० रु.

५. पोर्तुगीज मराठा संबंध – देसाई स. शं. प्रका. म. रा. साहित्य आणि संस्कृति मंडळ, मुंबई १–१९८९, मूल्य ३० रु.

## चरित्र

१. यशवंतराव चव्हाण – प्रका. प्रीतमसिंग जुनेजा, ४५ ए बुधवार पेठ, पुणे २ ले. रा. तु. पाटील, ३५ रु.

२. एका पानाची डायरी – ( गुजराथी ) वि. स. खांडेकर, आत्मकथा, अनु. विद्वांस गोपाळराव व भास्करराव प्रका. शोभा गद्रे, १० अल्पन सोसा. नवरंगपुरा अहमदावाद, १–१९८८ किं. ५० रु.

३. गुरुदत्त एक अशांत कलावंत – मुजावर इसक, श्रीविद्या प्रका. २५० शनिवार पेठ, पुणे ३०, १–१९८९, मूल्य ६० रु.

४. वेडया मना तळमळशी – कुलकर्णी वामनराव, विद्या प्रका. २५० शनिवार पेठ, पुणे ३०, १–१९८९ मूल्य ८० रु.

५. वेध व्यक्तित्वांचा – ज्योती दाते, श्रीविद्या प्रका. २५० शनिवार पेठ, पुणे ३०, १–१९८९, मूल्य ५० रु.

६. लेनिन ( एक जीवन संघर्ष ) – पाध्ये यशवंत, पॅरेमाऊंट प्रका. ९९ लक्ष्मी रोड पुणे ३०, १–१९७९, मूल्य ३५ रु.

७. नाटक झाले जन्माचे – मोये कृष्णा लक्ष्मण, राजहंस वितरण १ मीनाक्षी व्हुल्फांगु द सीव्ह मार्ग पणजी १, १–१९८८, किं. ५० रु. पृ. १५४

## लेख

१. नाटयविचार – देशमुख अनंत, नीहारा प्रका. पुणे २ १–१९८८, मूल्य ४८ रु.

२. रूपोत्सव – ढेरे अरुणा, सुरेश एजन्सी, २०५ शुक्रवार पेठ, पुणे २, १–१९८८, मूल्य ४० रु.

३. रानवा – गोळे प्रकाश, काँन्टिनेन्टल प्रका. विजयानगर पुणे ३०, १–१९८८, किं. २० रु.
४. यशोधन – संपा. शेवाळकर राम, म. रा. साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, १–१९८८, मू. १२० रु.
५. खूणगाठी – भावे नीलिमा, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०, १–१९८९, किं. ३५ रु.
६. संत साहित्याची संकल्पना – मराठी साहित्य परिषद – आंध्रप्रदेश, इसामिया बाजार, हैद्राबाद – ५०००२७, १–१९८९, मूल्य २० रु.
७. घनचक्करांची दुनिया – पाध्ये यशवंत, पॅरेमाऊंट प्रका. क्र. १०७ लक्ष्मी रोड, पुणे ३०, १–१९८७, मूल्य २० रु.
८. वाङ्मय विमर्श – जोग रा. श्री., व्हीनस प्रका. 'तपश्चर्या' ३८१ क, शनिवार पेठ, पुणे ३०, १–१९८९, किं. ८० रु.
९. साहित्य शोधणी – डॉ. देशमुख उषा, नीहारा प्रका. ५३४, बुधवार पुणे २ १–१९८९, ६० रुपये

### श. शास्त्र

१. आरोग्यछेद – डॉ. नागरे ईश्वरचंद्र, श्रीनाथ प्रकाशन, बाबुशेठ हलवाई मेन रोड, पैठण जि. औरंगाबाद, २५ रुपये

### कथा

१. चतुर गोष्टी – सौ. लेले प्रतिभा, नीहारा प्रका. पुणे २, १–१९८९ ६ रुपये



अनुक्रमणिका

# श्रद्धांजली

## डॉ. वा. भा. पाठक

टीका आणि टीकाकार या ग्रंथाचे लेखक, मराठीतील समीक्षक डॉ. वा. भा. पाठक यांचे ३० जानेवारी १९८९ रोजी निधन झाले. आशागीत, ओढणी, प्रवासी हे काव्यसंग्रह, पीएच्. डी. साठी लिहिलेला टीका आणि टीकाकार हा प्रबंध, नकोत त्या गोष्टी हा ललित निबंध संग्रह आणि आशेचे किरण ही कादंबरी यांजबरोबर आधुनिक मराठी काव्याचे अंतःप्रवाह हा आशयानुसार काव्याचा विचार करणारा ग्रंथ—असे विपुल लेखन आणि आयुष्यभर केलेले अध्यापन यामुळे पाठक यांनी कुठल्याही गटात नसूनही आपले असे एक स्थान निर्माण केले होते. इंग्रजीचा पांगुळगाडा घेतलेली मराठी समीक्षा त्यांना खटकत होती; परंतु इंग्रजी समीक्षे-पर्यंत आपण पोचू शकत नाही याचीही खंत त्यांना होती. साहित्याची गोडी लागेल अशा प्रकारे ते विद्यार्थ्यांना शिकवत. ते भिडस्त वाटत. संकोच बाळगत. अलिप्त-पणे राहात. परंतु वाङ्मयाचा रसिकपणे आस्वाद घेत. त्यांच्या स्मृतीला आदरांजली.

## डॉ. कालेलकर

जानेवारीत श्री. ज. जोशी गेले. त्यानंतरही मराठी साहित्य क्षेत्रावरचे यम-राजाचे हल्ले चालूच राहिले. डॉ. ना. गो. कालेलकर, डॉ. रा. शं. वाळिंबे आणि सोवतचे संपादक ग. वा. बेहेरे हे आपल्यातून निघून गेले. डॉ. कालेलकर यांनी भाषाशास्त्राच्या अभ्यासाला बैठक मिळवून दिली. त्यांच्या मृत्यूनंतर आलेले, त्यांची एक रशियन विद्यार्थिनी तात्याना हिचे पत्र वाचायला मिळाले. त्यात तिने जेव्हा जानेवारीत त्यांचा निरोप घेतला तेव्हा 'पुन्हा कधी भेटायचे?' असा प्रश्न विचारला. सर स्तब्धच राहिले. तिने पुन्हा विचारले तेव्हा ते म्हणाले, 'ते आतून यावे लागते.' कारण या आधीच्या निरोपाच्या वेळी 'पुन्हा लौकरच भेटू' असे ते म्हणाले होते; आणि ध्यानीमनी नसताना तात्यानाला भारतात पुन्हा यायला मिळाले होते. पारिभाषिक शब्दांच्या वापराबाबत त्यांचा दृष्टिकोन उदार होता.

## डॉ. रा शं. वाळिंबे

डॉ. रा. शं. वाळिंबे यांनी संस्कृत–मराठी–इंग्लिश साहित्याचाच नव्हे तर कलास्वरूपशास्त्राचाही विपुल व्यासंग केला; भरपूर लेखन केले. आपल्या वक्तृत्वा-नेही महाराष्ट्रभर संचार केला. आपल्या शिष्यांचीही प्रभावळ निर्माण केली.



अनुक्रमणिका

## ग. वा. बेहेरे

सोबतकार बेहेरे हे वादग्रस्त व्यक्तित्व होते; परंतु त्यांनी एक झुंजार पत्रकार म्हणून आपली प्रतिमा तयार केली. अनेक वाद ओढवून घेतले; अनेक खटले ओढवून घेतले. एक जबरदस्त पत्रकार–संपादक म्हणून आचार्य अत्र्यांचे स्मरण व्हावे अशी कारकीर्द गाजवली. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्याध्यक्षपदी ते काही काळ होते; परिषदेच्या कामाला अधिक लोकाभिमुख करण्याचा त्यांनी प्रयत्न केला. मराठी ग्रंथव्यवहार परिषदेची कल्पना ही त्यांचीच; तशा काही परिषदा झाल्याही. अमेरिकेहून बायपास सर्जरी करून आल्यावर आपल्याला मिळालेले जादा आयुष्य हे बोनससारखे आहे; त्याचा उपयोग लोककल्याणासाठी करावा असे ते मानत होते. डॉ. गांगल यांच्या लेखामुळे उठलेल्या वादळात शिवसेनेने पाठपुरावा करण्याची तयारी दाखवली असताना, 'हा लढा माझा आहे; मीच तो लढणार' असा त्यांचा हट्ट होता. त्यामुळे शिवसेनेला त्यांनी कटाक्षाने दूर ठेवले. असे वाद रंगवण्याची खुमखुमी त्यांना होती. त्यांचे रागलोभही मजेशीर असत. म. सा. पत्रिकेच्या दिवाळी अंकात त्यांनी श्री. म. माटे–पु. ग. सहस्त्रबुद्धे या दोघा गुरुजनांचा आपल्यांवर कसा प्रभाव पडला याचे विवेचन केले आहे. त्यांच्या स्वभावातील काही पैलू त्या लेखामुळे उलगडतात. 'सोबत' हा त्यांचा एकखांबी तंबू होता. महाराष्ट्रातील एका विशिष्ट मतप्रणालीला सोबतने आपला हरवलेला आवाज परत मिळवून दिला.

## एस्. एम्. जोशी

समाजवादी पक्षाचे एक थोर नेते माननीय एस्. एम् जोशी यांचे १ एप्रिल रोजी प्राणोत्क्रमण झाले. सतत राजकीय धबडग्यात गुंतलेले असूनही एस्. एम्.नी आपले आत्मचरित्र लिहिले; ते गाजले. मृत्यूच्या आदल्याच दिवशी 'आगळीवेगळी माणसे' हा त्यांनी लिहिलेल्या दहा व्यक्तिचित्रांचा संग्रह साधना प्रकाशनने प्रसिद्ध केला. एस्. एम्. हा महाराष्ट्राच्या राजकीय सामाजिक जीवनातील एक सात्त्विक नंदादीप होता.

या सर्वांच्या स्मृतीला विनम्र अभिवादन.



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषदेची ग्रंथपारितोषिके

महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे दरवर्षी देण्यात येणाऱ्या विविध पारितोषिकांसाठी १९८८ सालाकरिता खालील पुस्तकांची निवड करण्यात आली.

१. हरि नारायण आपटे पारितोषिक (कादं) रु. १०१/–
झेलझपाट – मधुकर वाकोडे (प्रकाशक : देशमुख आणि कं. पुणे)

२. वा. म. जोशी पारितोषिक (कादं) रु. १०००/–
पानिपत – विश्वास पाटील ( राजहंस प्रकाशन, पुणे )

३. ह. स. गोखले पारितोषिक ( कविता ) रु. ३००/–
कॅनव्हास – विलास गावडे ( नयना पब्लिकेशन्स, ठाणे २)

४. आनंदीबाई शिर्के पारितोषिक ( कथा ) रु. १०००/–
अवेळ – विजया वाड ( चंद्रकला प्रकाशन, पुणे )

५. नी. स. गोखले पारितोषिक ( कथा ) रु. ३००/–
प्रस्थान – ज्ञानेश्वर नाडकर्णी ( मॅजेस्टिक प्रकाशन, पुणे )

६. अ. स. गोखले पारितोषिक ( उत्कृष्ट ग्रंथनिर्मिती ) रु. ३००/–
कल्याणी – काळ व्यक्ती व दर्शन ( शंकरराव देशपांडे, – गतीमान प्रकाशन, पुणे )

७. गिरिजा गंगाधर जांभेकर पारितोषिक ( संपादित ग्रंथ )
महाराष्ट्रातील जाती संस्थाविषयक विचार – यशवंत सुमंत – डॉ. द. दि. पुंडे, संपादित ( प्रतिभा प्रकाशन, पुणे )

८. ह. श्री. शेणोलीकर पारितोषिक ( समीक्षा ) रु. ५००/–
रसमयी – दुर्गा भागवत – ( वरदा बुक्स, पुणे )

९. तुळशीराम वाघ पारितोषिक ( संतवाङ्मय ) रु. २५०/–
साक्षात्कार मार्ग – संदीप हळदणकर ( मार्ग प्रकाशन, पुणे १ )

१०. सुशील प्रधान पारितोषिक ( कुमार वाङ्मय ) रु. २००/–
टोला – आशा भाजेकर ( राजा प्रकाशन, माहीम मुंबई १६ )

११. विनायक कोंडदेव ओक पारितोषिक ( कुमारवाङ्मय ) रु. १००/–
सरदार भगतसिंग – दा. वि. कुलकर्णी ( मीनल प्रकाशन, कोल्हापूर )

१२. ललितेतर वैचारिक ग्रंथ :

शि. म. परांजपे पारितोषिक — रु. २५०/–
गोखले नवदर्शन – मु. गो. देशपांडे ( परिमुघा प्रकाशन )

ना. गो. चापेकर पारितोषिक — रु. २५०/–
बाईमाणूस – सरोजा परुळकर ( श्री विद्या प्रकाशन, पुणे )

विश्वनाथ पार्वती गोखले पारितोषिक — रु. १५०/–
ओलांडताना – लीला पाटील ( श्री विद्या प्रकाशन, पुणे )

श्री. शां. हणमंते पारितोषिक — रु. ३५०/–
रंगयात्रा – वि. भा. देशपांडे संपा. ( नाटयसंपदा प्रकाशन, दादर )

कै. लोकहितवादी उर्फ गोपाळ हरी देशमुख पुरस्कार — रु. ७५१/-
सावरकरांचा बुद्धिवाद – एक चिकित्सक अभ्यास – प्रा. शेषराव मोरे ( निर्मल प्रकाशन – नांदेड )

पारितोषिकाचा निर्णय करण्यासाठी परीक्षक म्हणून खालील व्यक्तींनी काम केले :

डॉ. हे. वि. इनामदार, प्रा. म. वा. अदवंत, श्री. अ. रा. तोरो, डॉ. ललिता कुंभोजकर, डॉ. चंद्रशेखर बर्वे, डॉ. गं. ना. जोगळेकर, श्री. म. श्री. दीक्षित, डॉ. अरविंद वामन कुलकर्णी, डॉ. जयंत वष्ट, प्रा. रेखा इनामदार–साने, डॉ. विलास खोले, श्री. राजा फडणीस, श्री. र. ग. मोदी, सौ. लीलावती भागवत, डॉ. शैला काळकर, डॉ. कल्याणी दिवेकर, श्री. सदा डुंबरे, श्री. शंकर सारडा, डॉ. लीला गोविलकर आणि डॉ. वीणा देव ( निमंत्रक )

□

अनुक्रमणिका







Maharashtra Sahitya Patrika Regd. No. 639

म. सा. परिषदेचे

नवे प्रकाशन

# भाषा व साहित्य : संशोधन (खंड ३ रा)

संपादक

डॉ. वसंत स. जोशी

प्रा. म. ना. अदवंत

पृष्ठे : सुमारे ३५०

( अनेक नामवंत संशोधक, लेखक यांचे लेख,
प्रबंधांचीं अद्ययावत् यादी, विस्तृत सूचीसह )

संपर्क : कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद
टिळकरस्ता, पुणे ३०.

( फोन : ४४ २९ ६३ )

अनुक्रमणिका

